दाहे ८३ वैद्यदीधलीादव्यओषधी । सांगूनगेला यथाविधी । पथ्यचुकूनकेलाआविधी । व्याधीबरीकेसना ८४ ह्मणेमीअपराधखणी । आपुलीकेलीपावलेंकरणीं । सदयव्हावेंअंतःकरणीं । प्रार्थीप्रार्थनासमर्थी ८५ मजपासून पडलेंअंतर । आतांद्यावेंअभयोत्तर । तुह्मीहोऊनिसुधाकर । याचकचकोरतोषवा ८६ मातेवदसीसत्यभाव । हाअजन्मअयोनिसंभव । विष्णुअवतारस्वयमेव । तोमानवगर्भनव्हेकीं ८७ येरीवदेयथार्थवचन । मजझालेंह रिहरदर्शन । आतांमीसंतानहीन । यावरीपूर्वप्रोक्तनेंकरंटी ८८ बैसोनकल्पतरूचेतळवटीं । केविद्यावीझोळीसगां ठी । चिंतामणीघेतांमुष्टी । दरिद्रगोष्टीकासया ८९ सुधारसघेतलाग्रासीं । मगकेंविंराहेउपवासी । साधिलियामनो न्मनासी । मगजीवदशापैंकैची १९० यावरीलल्लाटपटअक्षर । नचुकेनिश्चयोत्तर । कायरुसोनिदेवावर । देहप्रारब्ध चुकेना ९१ देहप्रारब्धह्मणावेंजरी । आयुर्मार्कंडेयषोडशसंवत्सरीं । सोळाकल्पकरीत्रिपुरारी । प्रारब्धबापुडें कायसें ९२ आणिपरिसिलेंपुराणीं । असत्यनव्हेसिद्धवाणी । नसलेंजरीप्राक्तनीं । नूतनमहर्षीनिर्मिती ९३ आपुलें ध्रुववचनयथार्थ । कदांनघडेअसत्य । हातोंहोयानिश्चितार्थ । निश्चयकरोनिठेविला ९४ कींसदैवदशेचाहोतांलाभ । तोचिअभ्युदयप्रारंभ । दशाउजळोनिसुलभ । प्रयत्नकरितांअनायासें ९५ पुत्रअभयप्रथमचआहे । तरीद्वितीय वस्मीलाहें । प्रार्थनींहोऊनिसाह्य । अभयद्यावेंमजप्रती ९६ नगरजनाचाउद्धार । दर्शनेंजाहलानिर्धार । परत्रप्रा प्तीसाचार । हातोभरंवसाअसेपैं ९७ माझेजननीजनक । त्यांसीपुत्रद्यावाआवश्यक । उभयकुळींसुखकारक । दर्श नेंहोयआपुल्या ९८ ऐसापरिसोनिकरुणावर । मत्स्येंद्रवदतीअभयवर । सिद्धीपावतीआर्तसर्व । निश्चयभा वअसावा ९९ पुत्रबंधूहोतीतुज । आर्तिसरतीसहज । परीएकसांगतीगुज । अनुष्ठातुह्मीसर्वही २०० कार्ति कशुद्धत्रयोदशीदिनीं । गोमयभस्मप्रातिमार्जनी । गोरक्षकपुजावेभावेंकरोनी । प्रथमयामींजाणिजे १ कर्दळीस्तं भमखरमंडप । पुष्पद्रुमपल्लवअमुप । रंगमाळाधूपदीप । सुगंधपुष्पेंअर्पावीं २ मंगळतुरेंजन्मकथन । मत्स्येंद्र

---

१ दैव. २ अमृत ३ दैवांतील ब्रह्मदेवाची लिपी. ४ प्रहरात.

गोरक्षाख्यान । परमरहस्यनिरूपण । आनंदेंकीर्तनकरावें ३ परिमळद्रव्यरंगचूर्ण । तुळसीबिल्वसुगंधचंदन। उधळोनिजयघोषपूर्ण । आदेशशब्दजागवा ४ जागरजागवारजनीं । व्रतसांगतांनाथार्चनीं । नाथासहद्विजभोजनीं । तांबूलदक्षिणाअर्पिजे ५ हेंव्रताचरणआचरतां । सर्वसिद्धीयेतीहाता । त्याहूनलाभनसेपरता । परमार्थातेंअधिकारी ६ तुळसीवृंदावनींजाण । हाअध्यायकरितांपठण । त्यासीसर्वसिद्धीप्राप्तहोऊन । कामनापूर्णहोतसे ७ पठणाश्वत्थवृक्षातळीं । एकमंडळप्रातःकाळीं । सुपुत्रहोयकुळीं । पराक्रमीज्ञातापैं ८ अशोकातळीं शोकहरण । औदुंबरींहोयज्ञान । अश्वत्थींमहद्भाग्यपरिपूर्ण । विकल्पवृक्षींवैराग्य ९ गोरक्षवल्लीसंनिध । पठणीं पुण्यअगाध । सर्वसिद्धीहोतीसाध्य । प्रत्यक्षतेस्थळीं २१० पुत्रबंधुविदेशांतरीं । श्रवणींभेटतीनिर्धारीं । संकटदुर्घट अशातेंनिवारी । स्वयेंगोरक्षआपण ११ असोतेवेळींनगरनरेंद्र । नमस्कारोनिप्रार्थीमत्स्येंद्र । ह्मणेस्वामीसदयसमुद्र । सुभद्रकेलेंसमस्तां १२ कल्पतरुचेंझालेंदर्शन । कैचेंराहेदरिद्रदैन्य । मीआर्तशरणअनन्य । उपदेशदेंगेंमजप्रतीं १३ नाथवदनीघडेसकळ । पुनर्दर्शनउतावेळ । निश्चयअसोंद्यानिश्चळ । तोतत्कालकाळघालवा १४ अवतारादिउत्साहजयंती । सिद्धसाधूंच्यापुण्यतिथी । पराक्रमीज्यांच्याकृती । त्याजागृतकीर्तीजयांच्या १५ ऐसातो अवतारउद्भवे । मत्स्यद्रगोरक्षजातसिवें । जनसमुदायआणिरावे । बोलवीतजातसे १६ मधुमक्षिकान्यायेंकरून । वेधवेधलेसर्वजन । चमत्कारेंकरितीनमन । हातोंस्वभावतयांचा १७ कथापाल्हाळह्मणून । श्रोतयांचें कंटाळेमन । परीस्तवनप्रवाहगंगाजीवन । हव्यासबुद्धीनाटोपे १८ यापरीगोरक्षउत्पत्ती । श्रोतयांनिवेदिली यथामती । आरुषभावेंसंतांप्रती । विनंतीहेचिअवधारा १९ पुढीलकथेचेंआमंत्रण । बहुतरसाळसुरसगहन । श्रोतियांविज्ञापीकरजोडून । मंदप्राज्ञेंप्रार्थितों २० सिद्धसिद्धामृतग्रंथीं । तेचिधरोनिसत्संगती । आदिनाथलीलामृतीं । यथामतीअनुवादे २१ अमनस्कग्रंथसारांश । वामदेवाकथितीमहेश । गुरुकल्पखंडींचाइतिहास । उभयाध्यायींकथियेला २२२ ॥ ॥ इतिश्रीमन्नाथलीलामृत । ग्रंथकर्ताभैरवसमर्थ । तृतीयाध्यायींआदिनाथ । नमनकरीसद्भावें ॥ २२३ ॥ ॥ अध्याय ॥ ३ ॥ ॥ ओव्या ॥ २२३ ॥ ॥ ॥ ॥ ७ ॥

# अध्याय ४ चवथा

श्रीगणेशायनमः । आदिअनादिआदिनाथ । जोअंजआजितअव्यक्त । सच्चिदानंदमायातीत । ओतंप्रोतपरिपूर्ण १ जेंआदिबीजविस्तारलें । जेंआदिमध्यअवसानींसंचलें । जेंअव्यक्तव्यक्तीसआलें । अवतारलेंहेंभूमंडळीं २ गतकथारहस्यसार । गोरक्षोत्पत्तिसविस्तर । आतांपरिसावीएकाग्र । कथासुंदरअवधारा ३ सिंहावलोकनें करून । चतुरश्रोतींकरावेंश्रवण । मत्स्येंद्रगोरक्षआपण । करितीगमनतेथुनी ४ येऊनिकनकाद्रिशिखरीं । गोरक्षातेंउपदेशकरी । पीठत्रयस्थापितनिर्धारी । पूजनकरीमत्स्येंद्र ५ आवाहनितांआदिनाथ । प्रत्यक्षतेथें प्रगटहोत । षोडशोपचारेंपूजाकरीत । गोरक्षस्वयेंनिजांगें ६ शक्तीचेंकरितांआवाहन । चिच्छक्तीदेतक्षीरपान । मंदस्मितसुहास्यवदन । प्रसन्नभाषणवदे ७ पयपरमामृतपात्रपूर्ण । गोरक्षानेंनीलावीआपण । कृपादृष्टीं अवलोकन । करितीझालीजगदंबा ८ पूर्णिमेचापूर्णइंदु । हर्षपावेपाहोनसिंधु । कींचकोरातेंचंद्रसुधाबिंदु । अर्पीतसेप्रीतीनें ९ तंविआदिनाथअवलोकनें । कृतार्थतापावूनधन्य । शरणयेऊनअनन्य । स्तवनकरीप्रार्थूनी १० जयजयमंगलकारका । जगन्नाथाजगदोद्धारका । भवइभकुंभस्थळविदारका । भवानीवरातू ११ आद्यआराध्यमत्स्येंद्रा । वेदवंद्याचित्समुद्रा । वेदप्रतिपाद्यानिर्द्वंद्वा । साध्यसिद्धाहोसीतूं १२ भगवदेकैलासनाथ । द्वीपांतरींअसतीनृपनाथ । त्यांतेंकरूनिसनाथ । नाथपंथचालवीं १३ गोरक्षेंआज्ञावंदोनी । शिवचरणींठेवीमूर्ध्नी । निघतेझालेतेथूनी । भूमंडळींप्रगटले १४ योगियांवेंदर्शनलभेदिनीं । ह्मणूनिगेलेपाताळभुवनीं । तेथेंबैसलेअनुष्ठानीं । भोगावतीतीरींपैं १५ सहस्रवर्षेंअनुष्ठान । गोरक्षकरितीरात्रदिन । तंवमत्स्येंद्रयेऊन । मस्तकींहस्तठेवित १६ अरेपुत्राहोईसावध । कासयाकरिसीदिनावध । जडजीवांतेंशोधूनिबोध । तयांसिद्धकरावें १७ गोरक्षेंगुरुनिरखोनी । स्तवितेझालेविनयवचनीं । तेंवर्णितांवाग्वाणी । विस्तारहोईलग्रंथातें १८ श्रीगोरक्षशतकग्रंथ । श्रवणेंपुरतीमनोरथ । तेंस्तवीगोरक्षनाथ । परमरहस्ययोगियां १९ विवेकमार्तंड

---

१ जन्म रहित. २ अंतर्बाह्यभरलेला. ३ शेवटीं. ४ तीन आसनें. ५ मुख. ६ संसार रूपी हत्तीचें. ७ शरीर

 विवेकतरणी । स्वयेंगोरक्षवदोनी । तीनसहस्त्रग्रंथवाणी । त्यांतीलश्लोकपैं २० ॥ श्लोक ॥ दीनोऽहंबुद्धिहीनो 
जंनिनिर्धनजरांकालपापौघनाशंवंदेमत्स्येंद्रनाथंमृदुपदकमलंयोगमार्गागमेच्छुः ॥ योमाध्व्यासाद्रिरास्वान्कथय
॥१॥ तिनितरांज्ञानमज्ञानचर्याध्वांतार्कविश्वभेदव्यपनयनपटुंचित्तजाड्यासहिष्णु ॥ १ टीका । गोरक्षउवाच । म ॥४॥
गवंदनकरूनिमत्स्येंद्रनाथा । मजयोगमार्गाचीआहेआस्था । चरणींठेऊनियांमाथा । मनींबहूआवडी २१
मजदाखवाहायोगमार्ग । मजअतिअनुराग । कृपाकरोनिसांग । सांगावाजीसमर्था २२ तवब्रह्मागेरीशिवस्था
न । बुद्धिपंगूसींकेंवीगमन । यास्तवओशंकितमन । महद्भावकठिणहा २३ नुलंघवेब्रह्मगिरीचाघांट । महागू
ढार्थदरेदरकूट । ऐसेंजाणोनिसंकट । केवींपुढेंमजमार्ग २४ करीमार्गमृदुमवाळ । जन्ममृत्युजराकाळ । तरीं
द्यावेंज्ञानअढळ । चंद्रसोज्वळज्यापरी २५ तरीतोमोक्षयोगमजलागीं । मागतसेंलडिवाळसलगीं । सद्गदहो
ऊनिअंगप्रत्यंगीं । मत्स्येंद्रानमीपैं २६ सद्गुरुभवांब्धीनौकाजाण । सद्गुरुदेईकैवल्यपण । स्वर्गास्थित्यंतकार
ण । सद्गुरूपूर्णब्रह्मपैं २७ पिंडब्रह्मांडाचीस्थिती । गोरक्षपुसेमत्स्येंद्राप्रती । तोश्लोकगोरक्षोक्ती । एकाग्रश्रो
तींपरिसिजे २८ ॥ श्लोक ॥ कियदंगुलमाकाशंकियद्गगनतारका । कतिधारावर्षतेमेघोकियद्धस्तावसुंधरा २
॥ टीका ॥ कितीअंगुलेंगगनप्रमाण । कितीनक्षत्रधाराघन । कितीहस्तमेदिनीमान । कृपाकरोनिमजसांगा
२९ ॥ श्लोक ॥ चतुरंगुलमाकाशंद्वेवैगगनतारका । दशधारावर्षतेमेघोऔटहस्तावसुंधरा ॥ ३ टीका । परि
सेंरेमाझ्यावत्सा । त्वांकेलीयुक्तपृच्छा । पिंडब्रह्मांडचिकित्सा । तुजइच्छाअसेकीं ३० तरींगोरक्षाअवधारी ।
व्योमचारअंगुलवदेनिर्धारी । दोननक्षत्रदशधारीं । मेघवृष्टीकरीतसे ३१ त्रयपरार्धहस्तमही । अनुभवपाहीं
यादेहीं । पिंडब्रह्मांडदेहविदेहाविदेही । याहूनिनाहींदुजेंपैं ३२ पिंडींप्रचीतशब्दींविश्वास । ध्रुवनिश्चयहेंमानस । नि ॥१५॥
मग्नहोऊनिसमरस । निर्दोषयशविचरेकां ३३ मगविनवीकरजोडून । शिवशक्तीचेंस्थानकोण । चंद्रचकोरन्यायेंकरून ।

१ उत्पत्ति. २ मृत्यु. ३ ज्ञातारपण. ४ सुरस वाणी. ५ संशयित. ६ संसार समुद्र. ७ आकाश. ८ साडेतीन. ९ हात

ओर्तमाझेंपुरवावें ३४ ॥ श्लोक । गोरक्षउवाच । कस्मिन्स्थानेवसेत्शक्तिःकस्मिन्स्थानेवसेत्शिवः । कस्मिन्स्थानेवसेत्कालोजराकेनप्रजायते ४ ॥ टीका । कोणेस्थानींशक्तीवैभव । वसेकोठेंपरात्पराशिव । कोठेंकाळ जरासंभव । स्थानकोणसांगावें ३५ ॥ श्लोक । पातालेवसतेशक्तिर्ब्रह्मांडेवसतेशिवः । अंतरिक्षेवसेत्कालोजरातेनप्रजायते ५ ॥ टीका । पाताळींवसेतीशक्ती । ब्रह्मांडींशिवाचीवस्ती । अंतरिक्षकालस्थिती । जराप्राप्त त्यायोगें ३६ तरीस्नानसंध्याकरून । करीयोगबळेंअराधन । सत्वरकरीमानसिकस्नान । तोंनिरूपणअवधारी ३७ मत्स्येंद्रसंहितामत्स्येंद्रनाथ । सांगतीमानसिकतीर्थ । तेस्नानेंहोवोनिसुस्नात । मानसकृतार्थहोतसे ३८ जळस्नानेंबाह्यमळजाती । परीमनोमळशुद्धनहोती । यालागींत्रिवेणीतीर्थी । स्नानसुस्नातहोईंका ३९ शतविधस्नानें असती । मानसिकस्नानसरीनपवती । तेंहीसांगतोंतुजप्रती।यथानिगुतीअवधारीं ४०जागृतीस्वप्न सुषुप्तीतुर्या । तेणेंसर्वदोषजातीविलयां । सांगतोंतुजगोरक्षराया। कासयाबायांखटपट ४१ ॥ श्लोक ॥ इडायांसंस्थितागंगापिंगलायमुनानदी । नमस्त्रैपथगामिन्यैसुषुम्नाख्यासरस्वती ६ । टीका । इडानाडीभागीरथी । पिंगलातरविजानिश्चिती । सुषुम्नासूक्ष्मसरस्वती । तीर्थनृपतीहाहोय ४२ तीर्थराजप्रयागप्रसिद्ध । प्राप्तझाल्या पुण्यअगाध । जीवदशाजाऊनिशुद्ध । कैवल्यसाध्यगुरुकृपें ४३ त्रिवेणीहेप्रयागतीर्थी । कमळासनकमळापती । तेथेंअक्षयींराहेपशुपती । सिद्धयोगियालाभतो ४४ ॥ श्लोक ॥ स्वस्थितःसद्गुरुरूपेणज्ञानगंगात्रिवेणिवै । सार्धत्रिकूटतीर्थेषुस्नानंकोटिगुणंभवेत् ७ टीका । चिद्व्योमींस्वप्रकाशगुरुनाथ । गंगात्रिवेणीप्रयागतीर्थ । साध्यसार्धत्रिकूटतीर्थ । कोटितीर्थीफळलाभे ४५ यास्नानाचाअगाधमहिमा । स्वयेंजाणेशंकरउमा । कायवंर्णूत्यामहात्म्या । योगप्रेमाअतर्क्य ४६ श्लोक । उन्मनीजलमध्येचरागद्वेषमलापहं । यःस्नातिमानसेतीर्थेजायतेस्फटिकोपमः ८ टीका । । उन्मनीजळाभीतरी । द्वैतदोषपळतीदुरी । मानसस्नानेंथोरी । स्फ

१ इच्छा. २ आकाश. ३ नाश. ४ चिद्रूप आकाश.

टिकस्वच्छताज्यापरी ॥ ४७ ॥ श्लोक ॥ अच्युतोहंहरिरहंसच्चिदानंदविग्रहं । अहंब्रह्मैवाहमभेदेनमुक्तोहमिति भावयेत ९ टीका । अहंकारजेथेंआभास । जीवदशेचाहोयनाश । द्वैताचाकरोनिग्रास । अद्वैतर्तेदिसेसर्वही ४८ धन्यधन्यात्रिवेणीस्नान । जेथेंअहंब्रह्महोयआपण । तेथेंसर्वतीर्थेंएकवटून । फळदेतातीआपुलें ४९ गंगागोदाफल्गुगोमती । यमुनासरस्वतीवेत्रवती । कृष्णापयोष्णीभीमरथी । अगाधकीर्तीजयांची ५० कावेरीतुंगभद्रामही । तापीताम्रपर्णीपाही । अलकाअटकाभोगावतीही । असंख्यतीर्थेतेस्थळीं ५१ आतांएकसंध्यासोज्वळ । नलगेदर्भ आसनजळ । परत्वसंधीस्थीरनिश्चळ । संध्याकाळसाधींहा ५२ । ॥ श्लोक ॥ ॥ हृदाकाशंचिदादित्यंप्रतिभातिनिरंतरं । उदयास्तेद्वयंनास्तिकथंसंध्यामुपास्महे १० टीका । हृदयाकाशींस्वप्रकाश । सूर्यप्रभांकित अविनाश । उदयअस्तजेथेंनसे । अर्घ्यकसेंमगद्यावें ५३ सत्रावीचेंजळ । सर्वदांप्रवाहप्रांजळ । अनर्घ्यअर्घ्यंवाहेसजळ । अढळदिवानिशीपैं ५४ आतांएकअजपागायत्री । सोहंसोहंमहामंत्रीं । एकवीससहस्रसाहाशेंअहोरात्री । जपहोतसेअनायासें ५५ अजपाअनाहतअलक्षा । नाथपंथाचीमुख्यदीक्षा । तुजानिवेदितोंगोरक्षा । अनुभवीपरीक्षाकरीतूं ५६ मूळाधारींवज्रासन । मूळबंधह्मणतयाकारणें । तेथेंकुंडलिनीउत्थापन । ऊर्ध्वपवनेंकरावें ५७ चतुर्दळींगणपतिस्थान । अजपाजपसाहाशतप्रमाण । स्वाधिष्ठानींसाहासहस्रजाण । चतुराननषड्दळीं ५८ मणिपुरतेंदशदलेंसीं । विष्णुदेवतेस्थळासीं । अजपाजपसाहासहस्रेसीं । अहर्निशींहोतसे ५९ अष्टदळींफिरेमनभ्रमर । दळपरत्वेंहोयविकार । स्फटिकस्वच्छप्रकार । उपाधीरंगेंतैसातो ६० अष्टदळींअष्टधावृत्ती । मनपद्मजातेंबोलती । पूर्वदळींहोयपुण्यमती । निद्रालस्यअग्नीदिसे ६१ याम्यदिशाक्रूरह्मणती।नैर्ऋत्यदिशेपापस्मृती । वरुणदिशातेक्रीडास्फूर्ती । वाय०यगगनबुद्धीते ६२ उत्तरेतेरतिकल्पना । ईशान्यधर्मवासना । मध्यवैराग्यभावना मनेच्छास्थितीजाणिजे ६३ कमळकेसरीजागृतमन । कर्णिकेअवस्थेंतस्वप्न । लिंगेसुषुप्तिप्रमाण । याव

१ जीव व आत्मा असा भेद, २ ब्रह्म, ३ ऊर्ध्व वायूनें.

रीमनकमळअष्टदळ ६४ हृदयेस्थानचक्रेंद्वादश । अजपाजपषड्सहस्र । द्वादशजळस्वयंप्रकाश । अनाहतच क्रबोलती ६५ विशुद्धचक्रकंठस्थान । जीवात्मादेवताज्योतिर्वर्ण । तेथेंषोडशदळप्रमाण । अजपाजपसहस्र ६६ ललाटतेपरमात्मस्थळ । कोटीचंद्रसूर्यबंबाळ । भ्रूसंधीअग्नीचक्राद्विदळ। सहस्रजपसंख्या ६७ सहस्रदळीं सद्गुरुदेवता । प्रकाशकोटीशशिसविता । अखंडध्वनीनादात्मता । जपसहस्रतेस्थळीं ६८ हेअजपामाळषडच क्रमणी । सुषुम्नेचेवोवोनिगुणीं । अजपाफेरेफिरेस्मरणीं । सहस्रदळमेरुपर्यंत ६९ मगवदतीगोरक्षनाथ । दश नादजोक्षअनाहत । तोस्वामीकरवाश्रुत । आर्तमाझाबहुतअसे ७० परिसपुत्रानादअनाहत। आतांपरिसेतूं निवांत । एकाग्रकरोनिचित्त । श्रवणकरीतूंपाडसा ७१ प्रथमरवचिकारखरा । चिंचिनीशब्दतोदूसरा । घण घंटानादतीसरा । शंखस्फुरणहाचतुर्थ ७२ पंचमतोतंत्रीनाद । षष्ठमतोतालशब्द । सप्तवेणुप्रसिद्ध । अष्टमृ दंगसुशब्दीं ७३ नवमवाद्यदुंदुभी । मेघनाददशमनभीं । बृहद्विरागगनगर्भी । दुमदुमीतभरलेंसे ७४ तंतवितंत घनसुस्वर । चतुर्विधवाद्यांचाप्रकार । जेथेंअसेनिरंतर । नादानुसंधानयोगियां ७५ मुख्यआसनींआसनजय। तेणेंयोगाभ्यासहोयविजय । येविषयींअभिप्राय । आसनविधीसांगतों ७६ नवग्रहांतदिनकर । विबुधांतसहस्रने त्र । आयुधांमाजिवज्र । तेंविवज्रासनश्रेष्ठहें ॥ ७७ ॥ श्लोक ॥ नासनंवज्रसदृशंनकुंभःपवनोपमः । नखेचरी समामुद्राननादसदृशोलयः ॥ ११ ॥ टीका । वज्रासनाहूनिआसनपर । कुंभकाहूनवायूथोर । खेचरीतेमुद्रा शिखर । वायुमध्येंकुंभक ७८ याहूननसेदुसरीसरी । मत्स्येंद्रवदतीनिश्चयोत्तरीं । गोरक्षाहेंसत्यअवधारी। सि द्धासाध्यआसनहें ७९ त्वंपदआणिअसि । तेंकैवल्यस्वानंदराशी । तेथेंहोऊनतापसी । निजांगेंमीफिरतसें ८० हायोगमार्गपुरातन । हृदयमांदुसींकरिजतन । हेंचिमाझेंअचळधन । पुत्रह्मणोनिअर्पितों ८१ गुह्याद्गुह्यपरम गुज । प्रतारणाकेवीराखूंतुज । तूंपात्रजाणोनिसहज । वोगरितोंसंतोषें ८२ मत्स्येंद्रह्मणेवज्रासन । ऐकहठयोगलक्ष

१ हृदयांतीळ चक्रें. २ सहाहजार. गायत्री. ३ भृकुटी. ४ रवि. चंद्र. मंगल. बुध. बृहस्पति. शुक्र शनि. राहु. केतु.

ण । अंघ्रिमूळवामचरण।मूळाधारींरोधावा ८३ आधारींचारिमातृकाअसती । कुंडलिनीसर्पिणीऊर्ध्वगती । जागृ अ०
तकरोनितेशक्ती । स्वाधिष्ठानींपदरोधी ८४षड्दळींषड्मातृका । उड्डियानीकंदह्मणतीदेखा । त्राहाटकरोधोनिकुं
भका । ऊर्ध्वपंथेंलावावा ८५ अनाहततेंद्वादशदळ । द्वादशामाजिजाश्वनीळ । अनाहतींदळचक्रतेंकेवळ । नादानु ॥४॥
संधानतेथूनी ८६ षोडशदळींषोडशमात्रापाही । जीवात्माराहेतेठाईं । जालंधरबंधस्थानतेंही । गुरुपुत्रतेजाणती
८७ ललाटसंधीद्विदळ । दोनमातृकेचेंतेंस्थळ । त्रिकूटश्रीहठादिकेवळ । उल्हाटऔटपीठतें ८८ अग्निच
क्रवैन्यचक्र । कोटीरविआज्ञाचक्र । काकीमुखस्वतंत्र । चंद्रसूर्यदोंभागीं ८९ सव्यभागींभास्कर । वामभागीं
वसेचंद्र । सुषुम्नामध्यभागींसुंदर । दाहकळादाहकत्व ९० बारासोळाकळाअसती । सत्राबीजीवनकळाह्मणती
तिचीकायसांगूंख्याती । योगियांचीनिजजननी ९१ सत्रावीलंबिकामार्गें । जोपानकरितानिजांगें । तोचिरंजीव
चिरकाळयोगें । भोगीभोमउन्मनींवसे ९२ पंचमुद्राखेचरीभूचरी । चांचरीअगोचरी । अलक्षापांचवीखरी ।
मुद्रापंचकजाणावें ९३ पंचमार्गतरीकोण । ऐसाकरिसीलप्रश्न । पिपीलिकाविहंगमीन । कपिशेषजाणावा ।
९४ ॥ श्लोक ॥ खेचरेखंतुमध्यस्थंउन्मनीगगनाकृतिः । अंगुष्ठमात्रस्वस्थानेचक्षुश्चंद्रःप्रकाशते १२ टीका ॥
खेचरीतेगमनींलीन । उन्मनीचेंलयस्थान । शाखांचंद्रन्यायेंकरून । चंद्रपाहेतेथूनी ९५ काळदमनकल्प
नाधन । योगमार्गेंयोगसाधन । त्रिकाळज्ञानैश्वर्यसंपन्न । मगगमनात्रिलोकीं ९६ भूतभविष्यवर्तमान ।
शीतोष्णादिअदृश्यसाधन । अंतरसाक्षअंतीरक्षगमन । योगीफळलाभेपैं ९७ आतांऐककाळज्ञान ।
मृत्युपरीक्षाचिन्ह । तेंअवलोकीलक्षण । खुणपाहाणेंतेस्थळीं ९८ ॥ श्लोक ॥ अरुंधतींध्रुवंचैव
विष्णोस्त्रीणिपदानिच । आयुर्हीनानपश्यंतिचतुर्थंमातृमंडलं ॥ टीका ॥ अरुंधतीधृतिध्रुव । ॥३॥
त्रिकुटीविष्णुपदानिश्चय । मातृमंडलचतुर्थहोय । आयुर्हीननपाहाती ९९ ॥ श्लोक ॥ अरुंधतीभवेताजिव्हा

१ सुषुम्ना नाडी. २ खेचरी भूचरा इत्यादिक. पांचमुद्रा. ३ टक्याच्या डाहाळीवर चंद्र. ४ ज्यांचे आयुष्य. भरले ते पुरुष.

ध्रुवोनासाग्रमेवच । भ्रुवोर्विष्णुपदज्ञेयतारकमातृमंडल १३ ॥ टीका ॥ अरुंधतीजिव्हास्थान । नासाग्रत भ्रू जाण । भ्रूमध्यविष्णुपदनिर्वाण । मातृमंडलतारकतें १०० ॥ श्लोक ॥ सूर्येणबध्यतेसूर्यश्चंद्रश्चंद्रेणब ध्यते । योजानातिक्रियामेतांत्रैलोक्यंवशयेत्क्षणात् १४ ॥ टीका ॥ सूर्येंसूर्यकरावाबद्ध । शशीनेंशशि निरोध । हेजाणक्रियाविशद । तरीत्रैलोक्यवश्यपैं १०१ ॥ श्लोक ॥ चंद्रांपिबतिसूर्यश्चसूर्यींपिबतिचंद्रमाः । अन्योन्यकालभावेनजीवेच्चंद्रार्कतारकं १५ ॥ टीका ॥ चंद्रामृतासूर्यग्रासी । सूर्यसुधांशुशशीप्राशी । हीकळाअन्योन्यभावेंसीं । चिरंजीवकल्पतोसाधी १०२ हायोगमार्गेदुर्घटपाहातां । साध्यहोतांसा धितांभलता । मनवासनाक्षयनहोतां । कैसोसिद्धीतयांसी १०३ आतांअसोइतिहास । कथिलाकाळग तिसारांश । जोआचरणकरीतयास । स्वात्मसाम्राज्ययेहातीं १०४ ऐकब्रह्मरंध्रसहस्रदळ । श्रीगुरुआदि नाथाचेंस्थळ । ज्योतिर्मयनिरामयकेवळ । अचळअढळपैं १०५ अखंडध्वनीसोज्वळा । कोटीशोशि सूर्याचीकळा । कींस्थीरतीअनंतचंपळा । शीतोष्णांविणप्रकाशे १०६ चहूंवाचेसींअगोचर । चपळ मनतेथेंस्थीर । जेंउन्मनीचेंमाहेर । सूर्यापकताहोतसे ७ जेंसापत्नाचींमनें । तेसिंइंद्रियभिन्नपणें । एकाग्र तेचींसाधनें । एकवटतीऐक्यपैं ८ मींतूंपणासीभेद । अखंडवस्तूचिअभेद । आनंदाचाब्रह्मानंद । तेथेंअनुवाद कायसा ९ स्फटिकमंदिरदैदीप्यदीप्ती । अनेकप्रज्वळीतज्योती । अंतरबाह्यप्रकाशती । आत्मस्थितीभावा तें १० यापरीगोरक्षयोगबोध । योगस्थितीसूचकशोध । उपदेशग्रंथसिंधुअगाध । त्रुटिश्रोतियांकथियेला १११ जेथेंश्रुत्यादिमार्गखुंटली । तेथेंस्मृतीचीकायसीगती । मूर्खपणेंमीमंदमती । कायास्थितीतेसांगूं १२ हठयोग तोहाटकेश्वरीं । गोरक्षतेथेंसाध्यकरी । जेदिवसनरात्री । पाताळस्थळींजाणपां १३ महाफणिमस्तकीमणी । प्रका शतीजेवींतरणी । तेथेंभोगावतीतटिनी । तटींहाटकेश्वरधूर्जटी १४ प्रशस्तप्रकारसादर । पाठांगणींरत्नेंविवि

---

१ चंद्र. २ वीज. ३ थंड व उष्ण. ४ आंत व बाहेर.

 

ध । दिव्यमणीजोडिलेअभेद । विद्युत्ध्वजतळपती १५ माणिक्यलिंगअभंग । नित्यार्चितीशेषादिनाग । ज याचेदर्शनेंहठयोग । वासुकीशेषाप्राप्तहोय १६ योगसाध्यहाटकेश्वरीं । योगपातांजळविवरी । श्रीगोरक्षातें निर्धारीं । मत्स्येंद्रकृपेंसाधिला १७ मत्स्येंद्रवरदअनुभवसिद्धी । गोरक्षालागींसमाधी । पाहूनिसवडसंधी । मत्स्येंद्रजातीसत्वर १८ घेतहाटकेश्वराचेंदर्शन । तेथेंप्रगटलेनाथभगवान । श्रीआदिनाथनिरंजन । भेटते झालेमत्स्येंद्रा १९ तेथेंपातलेशेषवासुकी । अनेकचक्षुश्रवेशृंगी । शिवदर्शनासवेगी । भोगंद्रयेतआवडीं १२० तोंदेखिलेमत्स्येंद्रनाथ । साष्टांगकेलाप्रणिपात । मनींइंगेकृतार्थ । आजधन्यजाहलों १२१ शेषसंतोषेअं तरीं । स्वागतपुसेअवसरीं । मत्स्येंद्रवदतीउत्तरीं । योगमगसर्वदा १२२ममयोगयुक्तीसविस्तरें । वदतेझाले परस्परें । तेंसांगतांसविस्तरें । ग्रंथसमुद्रपसरे २३ शेषवदेमत्स्येंद्रमुनी । चलावेंआपुलेभुवनीं । येरूअवश्य ह्मणोनी । गमनकरीशेषालयीं १२४ करोनिषोडशोपचार । पूजाद्रव्यअळंकार । अमोल्यरत्नेंपरिकर । पा ताळमणीअर्पिले २५ जिकडेतिकडेपारिस । चिंतामणीचहूंकडेस । चिंतामणीपरिससंघतसे । मत्स्येंद्रनाथपैं १२६ दुर्लभवस्तुपृथ्वीवरी । ह्मणोनित्यांतेंअंगिकारी । गूढरक्षीझोळीमाझारी । संतोषअंतरींहोतसे २७ आज्ञामागोनिसत्वर । निघतेजाहलेमत्स्येंद्र । इच्छागमनस्वइच्छाचार । मुक्तझालेतेथुनी २८ एकअयनपर्यं त । गोरक्षहोतेसमाधिस्थ । पुन्हांहोऊनिजागृत । वृत्तांतश्रोतींऐकावा २९ असोतयेअवसरासीं । तक्षक प्रगटलामनुष्यवेषीं । स्नानसंध्यायोगाभ्यासी । करीतबैसेकुटिळतो ३० दांभिकाचाआचार । मद्यापि याचातत्वविचार । जाराचाकायसदाचार । रायविनोदज्यापरी १३१ सुस्नातवातांबुपर्णाशन । वर्तेनैराश्यें करून । विवरींबैसेएकांतलक्षून । भस्मलेपनमुद्रादि ३२ पर्णाशनकरीमेष । ह्मणोनिकायवैराग्यत्या स । मीनसदांउदकींअसे । स्नानमहिमानेणेतो ३३ नादाबुसंधानतन्मयफणी । परीमनोलयनव्हेत्यालागोनी ।

१ सर्प २ नमस्कार. ३ सहामहिने. ४ वारा. उदक. व पानें. ५ आशारहित.

वायुआहारह्मणोनी । वायुरोधनींनव्हेतो ३४ भूमिजळाचीनिराशा । तोचातकविलोकीआकाशा । त्यासीं
कायनिस्पृहदशा । अंगींयेईलत्याचे ३५ मूषेककरीबिळींवास । घडेकाययोगाभ्यास । खरैंभस्मींलोळेत्यास ।
भस्ममहिमानेणवे ३६ बकाचेंएकाग्रध्यान । ह्मणोनिकायतेंब्रह्मचिंतन । मैंदमाळामुद्रासन । परीमार्गघ्नहोय
तो ३७ ऐसातोमंदबुद्धी । लाऊनबैसेसमाधी । तोह्मणेकायसीउपाधी । तेथेंआलीनेणवे ३८ गोरक्षाह्मगेका
येथें । मानवपातलापाताळातें । ऐकोनिगोरक्षवदेत्यातें । भयआह्मातेंकोणाचें ३९ परीतोखवळलादुर्जन ।
भयांनकरूपप्रगटोन । लंबायमानविस्तीर्ण । पतंगझेंपावेदीपातें ४० विगतँदर्पबृहत्सर्प । त्रिकाळव्याळका
ळरूप । सरळसळकलेअमुप । वळवळोनिआला १४१ गरळवमीतसेमुखा । भडभडोनिघतीअग्निशिखा ।
धुधुःकारेंधूम्रदेखा । धुंदावल्यादिशादाही ४२ द्वंद्वधरोनिदंदशूक । निर्द्वंद्वासिझेंपावतीदेख । तामसयोनि
आविवेक । क्रोधयुक्तअंतरीं ४३ पिंवळेकाळेगंव्हाळे । बिळेंवारुळेंत्यागूनसकळ । उसळोनियांसोनसळे ।
पाताळींकुळेंव्याळांची ४४ वखाळोनिवोकितीज्वाळा । काळकूटाच्यामुखींगरळा । सरसावोनिसळसळा ।
सकळगोळाजाहले ४५ पूर्वदिग्बंधनमर्यादादेखा । सागराजेवींमर्यादरेखा । स्पर्शावयाअवांका । कोणातवक्रा
नव्हे ४६ गगनमंडळगोरक्षवदती । तेथेंनसेकाळगती । शस्त्रअग्निनपवती । जळवज्रघातीनमरूं ४७ विषा
चेंविषपणजाय । अग्नीहीशांतहोय । काळातेंहीग्रासिताहे । मृत्युजायमरोनी ४८ मगपुच्छावर्तकुंडलाकारी ।
कुंडलेतेदुर्गाशरीरीं । वेढाविष्टोनिदुराचारी । धुसधुसफूत्कारी ४९ ऐसेंपाहोनिनाथ । भस्मउधळिलेंकिंचित ।
बहुप्रगटलेविनतासुत । पाहोनिपळतसर्प ५० अरुणानुजप्रळयकृतांत । भीमभयानकहाकदेत । दचकलेका
द्रवेयतेथें । इतरांपाडकायसा १५१ ज्याभयेंआह्मींयेथें । वासकरोनिपाताळातें । तेथेंहोपातलाजाणमृत्यू ।
होणारनचुकेपै ५२ मुखपकद्रूसुत । मुह्यबैसोनिविचारकरीत । हातोढवलाप्रळयानर्थ । कारणकायकळेना ५३

---

१ उंदिर. २ गर्दभ. ३ भयंकर. ४ गर्वरहित. ५ गरुड.

एकवदतीगोरक्षमुनी । हाटकेश्वरींअनुष्ठानीं । बैसलेहोतेतेस्थानीं । नकळेकोणीछाळिलें ५४ विचित्रयोगेमा येचेंविंदान । गरुडगेलेगुप्तहोउन । सर्वसर्पशरणयेऊन । स्तुतीस्तवनकरिताती ५५ त्यांतएकफणिव र । पाहूनकरीनमस्कार । विष्णुविरंचींकिंवाहर । अंशावतारमजगमे ५६ तोवदेस्वामीप्रती । नकोमजयाता मसांचीसंगती । नलगेसर्पदेहाचीबुंथी । मजलागींजाणपैं ५७ कांहींनघडेआत्मसाधन । सक्रोधसदाअंतःकर ण । मीअनन्यस्वामीसशरण । अनुग्रहदेईंदयाळा ५८ त्याचेंअंतरपाहून । सदयकृपदयाघन । म स्तकींहस्तठेऊन । उपदेशदेततयातें ५९ तोंतत्क्षणींदिव्यदेही । होताझालाअही । मठस्थापिलातेठाईं । मठाधिपतीतोकेला ६० ठेवितेझालेनामाभिधान । नागनाथनामेंकरून । शेषादितेथेंयेऊन । पूजाकरिती सर्वही १६१ करीगिरिमस्तकींउत्पन्न । अमौल्यअनर्घ्यअर्पिलेंरत्न । जेंअसाध्यनिर्जरप्रयत्न । तेंचप्रीती नेंआणिती ६२ सुगंधद्रव्यदेतविलेपन । आह्मींस्वीकारूंभस्मलेपन । अळंकारकोठेंकरूंजतन । बरीशैलीशृं गीहे ६३ सकळशरणयेऊनपाही । ह्मणतीसेवाघडलीनाहीं । पूजाहीअंगिकारकेलानाहीं । तरीआज्ञाकांहीं करावी ६४ गोरक्षह्मणेभोगेंद्रनाथा । तुह्मींयावेस्मरणकरितां । कारणजाणूनतत्वतां । स्मरतांयावेंतु ह्मीतेथें ६५ ऐसेंवदोनित्यांतें । गुप्तझालेगोरक्षनाथ । धन्यमहिमाकद्भुत । वर्णितीनाथातें ६६ हाग्रंथपूर्ण ब्रह्मगिरी । पारायणप्रदक्षिणानरकरी । तयायोगगतीनिर्धारी । योगसिद्धीयोगपैं ६७ श्रवणपठणयाग्रंथा चें । तयांभयनसेसर्पादिकांचें । पठणकेलियातयांचें । मोक्षालयजाणिजे ६८ हाअध्यायसर्वांतसा र । जेविंभारतींगीताथोर । भावेंवाचीलजोनर । प्राप्तसिद्धीसर्वही ६९ जेथेंश्रुत्यादिमार्गघुसती । तेथेंस्मृती चीनसेगती । मगमूर्खपणेंमीमंदमती । कायस्थितीतेंसांगूं ७० यापरीगोरक्षबोध । योगस्थितीदाविलाशोध । उपदेशग्रंथसिंधुअगाध । त्रुटितश्रोतियांकथियेला १७१ जेसिद्धसिद्धांतसंगती । तोचिआश्रयग्रंथप्रती । डोळसाश्रयअंधगती । गमनकरीतत्संगें ७२ हाग्रंथभवाब्धीचेंअयोनिसंभव । योगदीक्षेचेंपूर्णवैभव । जेस्वप्र

काशस्वयमेव । काव्यगौरवकायसें ७३ महाराजगोरक्षसमर्थ । त्याचेकृपेंचालेंग्रंथ । लेखनपठणेंमीकृतार्थ । मृ गमदव्यवहारज्यापरी ७४ चतुर्थअध्यायचौथीमुक्ती । कींवाणीतेचौथी । कींअवस्थांत्रयाहूनजेपरती । काय स्थितविंदूहे ७५ अध्यायचौथापुरुषार्थ । कींचवथापरमार्थ । येथेंचित्तचतुष्टयएकहोत । वेदमथितार्थहाअध्याय ७६ श्रीमतआदिनाथलीलामृत । ग्रंथकरविताभैरवसमर्थ । त्याचेवरदेआदिनाथ । चतुर्थाध्यायींवर्णिला ७७ पुं डलीकवरदस्मरण । ह्मणाएकदांजानकीजीवन । हरहरपार्वतीरमण । गुरुजेयतितेंस्मरावें ७८ ज्यास्मरणमा त्रेंकरून । तुटतीभवबंधनें । जन्मदुःखजरामरण । जन्मांतनबाधी १७९ ॥ अध्यायचवथासमाप्त ॥ ४ ॥



## अध्याय ५ पांचवा ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीमतआदिनाथजगदोद्धारा । निष्प्रपंचानिर्विकारा । निर्द्वंद्वानिःसंगाअगोचरा । परा त्पराजगद्गुरू १ तूंअखिलप्रकाशसनातना । ज्ञानाग्निअज्ञानदहना । पूर्णब्रह्मापुरातना । पुराणपुरुषासर्वाद्या २ तूंअढळस्थचिंव्योमी । ह्मणूनयोगीगगनगामी । तेथेंहोतीब्रह्माअहमस्मि । अढळधामींनिवासी ३ पंचत त्वींयोगस्थिती । तेथेंधारणेचीऊर्ध्वगती । पश्चिमदिशेगमनकरिती । तेथेंवस्तीतयांची ४ योग्याचेंगगनींगमन । चातकापरीअवलोकन । कींजलजअवलोकीसूर्यकिरण । व्योमस्थानपाहती ५धन्यधन्यतेगुरुभक्ती । नव्याणव वकोटीचक्रवर्ती । गोरक्षउद्धरीतयांप्रती । इतरगणनानव्हेची ६ अनेकतारिलेनेणोंकिती । बहुतगेलेयाचपंथीं । सप्त चिरंजीवांचरव्याती । भुवनत्रयींनसमाये ७परीनाथप्रतापें अगाध । चिरंजीवझालेअसंख्यासिद्ध । पावोनियांअक्षयप

१ कस्तुरी. २ अध्यात्मिक आधिभौतिक. आधिदैविक. ३ सुख. दुःखादिक. द्वंद्वें. ४ चिद्रुपी. आकाश.

द । अभेदलेस्वरूपीं ८भर्तृहरीगोपेंदुज्ञानेश्वर।अद्यापिअसतीनिरंतर।नाथसांप्रदायमहिमाथोर । शेषअशक्तवर्णि
तां९तेकाळदंडादंडिती।तेजासमृत्युजराजाळिती।तेमृत्युतेंमारिती ।ग्रासकरितीकळिकाळाचा१०काळदंडउच्छे
॥१॥ दुन । चिरंजीवझालेकोण । विविधनामेंकराश्रवण । हटप्रदीपिकाश्लोकपैं ११ श्लोक ।श्रीआदिनाथोमत्स्येंद्रःशार ॥८॥
दानंदवैभवः।चौरंगीमीनगोरक्षविलेपाक्षाबिलेशयाः १ मंथारभैरवोयोगीसिद्धबुद्धश्चकुक्कुटी ।पौरंटकःसुरानंदःसि
द्धिपादश्चचर्पटी २ करणीपूज्यपादश्चबिल्वनाथोनिरंजनः । कपालीबिंदुनाथश्चकाकचंडीश्वरोदयः ३ तथासू
क्ष्मप्रबुद्धौचघोंडाचालिघंटिणीतथा । बालकीनागबोधश्चचंडःकापालिकस्तथा ४ इत्यादयोमहासिद्धाहठयोगप्र
भावतः। खंडयित्वाकालदंडंब्रह्मांडेविचरंतिते ५ टीका । श्रीनाथादिमत्स्येंद्रनाथ । शारदानंदवैभवनाथ । चौ
रंगीमीनगोरक्षनाथ । विलेपाक्षबिलेशय १२ मंथारभैरवयोगिनाथ । सिद्धबुद्धकुक्कुटीनाथ ।पौरंटकसुरानंदनाथ।
सिद्धिपादचर्पटी १३ करणीपूज्यपादनाथ। बिल्वआणिनिरंजननाथ । कापालीसहबिंदुनाथ । काकचंडीश्वरोद
य १४ सूक्ष्मसहप्रबुद्धनाथ।घोंडाचालीघंटिनीनाथ।बालकीआणिनागबोधनाथ । चंडसहकपालीहा १५ इत्या
दिहेंमहासमर्थ । हठयोगीयथापंथ । काळदंडखंडितीस्वसामर्थ्यें । स्वइच्छेंविचरतीब्रह्मांडीं १६ काळचक्रसर्वत्र
माथा।परीदंडमारितीचक्रमाथा।तेचिसाधितीपरमार्था । पिंडब्रह्मांडस्थितीते १७उभयस्थळींयोगीविचरती।
निमग्नस्वानंदींडुल्लती । जेआपपरनेणती । अगाधकीर्तीजयांची १८ जयांअपपरनसेचिदुजें । तेकदानघेती
द्वैतवोझें । उन्मनीसिघेऊनिपैजें । स्वानंदभोगतुर्येसीं १९ असोयोगसाधनपाताळीं । गोरक्षसाध्यतेकाळीं ।
नंतरयेऊनभूमंडळीं । चिरंजीवदशापातली २० नढळेजयाचेंनिमिषानिमिष । अधोगतीनसेश्वासोच्छ्वास ।
पृथ्वीहूनअंतरिक्षअसे । छायापातनहोय २१ सहजजातांपृथ्वीवरून ।जिकडेकरितीअवलोकन । परीसचिंता
तामणीपाषाण । कृपादृष्टींहोताती २२ पंचाशत्कोटिविस्तीर्ण । धरादेवीचेंप्रमाण । अनेकबीजौषधिनिर्माण। ॥१३॥

१ मंथारभैरव इत्यादिक योगी. २ उत्तम. अर्थ. ईश्वर प्राप्ति. ३ ज्ञान. ४ चैतन्यरूपी.

तेथूनप्रगटहोतसे २३ अष्टादशभारवनस्पती । स्त्रियारूपेंसिद्धोतिष्ठती । शरणयेऊनबद्धहस्ता । आज्ञाइच्छ
तीस्वामीची २४ पुनर्वसुमहामंडळीं । शीघ्रप्रगटतीपायांतळीं । ह्मणतीआज्ञायेकाळीं । पादस्पर्शकरावा २५
२५ सिद्धसाबरतंत्रादिक । त्यासशापीकैलासनायक । तीं शरणयेऊनिसम्यक । उःशापमागतीशिवातें २६
प्रसन्नहोऊनपिनाकपाणी । उःशापवदलावरदवाणी । तुह्मीगोरक्षाश्रयकरोनी । सिद्धीहोईलतुमची २७ चौदा
विद्याचौसष्टीकळा । भार्याशेषेंतिष्ठतीसकळा । अनन्यभावेंदीनदयाळा । चरणयुगळवंदिती २८ छप्पन्न
कोटिमहामंत्र । अनुकूळहोऊनिएकत्र । ह्मणतीधन्यहामत्स्येंद्रपुत्र । योगावतंसविरूढला २९ सर्वांतरसमसा
म्यसबाह्य । पाहातेंपाहाणेंहीनराहे । आब्रह्मस्तंभकोंदलेंआहे । रितेंनराहेकदाही ३० निद्यवंद्यभेदभास । ना
हींजयाआशापाश । स्वयेंचिझालाअविनाश । सर्वत्रअसेंव्यापकजो ३१ कायपहावेंकायत्यजावें । कायद्यावेंकाय
घ्यावें । कायवदावेंकायपुसावें । जरीअसावेंद्वैततें ३२ तोसर्वांहूनिनिराळा । निराळींवर्तेसुखसोहळा । धन्य
धन्यत्याच्यालीळा । त्याच्याकळातोजाणे ३३ ऐसेंचिन्हींतेमंडित । तोचिमाझेसद्गुरुनाथ । त्याचामीछात्रांत
रगत । आदिनाथप्रणामी ३४ इकडेकथावर्तलीकैसी । मत्स्येंद्रपातलेजयश्रियेसीं । उभेठाकलेद्वाराशीं । सद्बोध
गृहस्थगृहासीं ३५ मत्स्येंद्रमुखींअलक्षोत्तरी । शब्दसद्बोधसर्वांतरीं । चातकमेघबिंदूपरी । हर्षेंदर्शनापातली
३६ नित्यस्मृतीचेपरिपाठीं । तोमत्स्येंद्रनाथदेखिलेदृष्टीं । हर्षेंवोसंडोनिपोटीं । चरणींमिठीघालित ३७
त्राहेत्राहेह्मणेगुरुदातारा । नेत्रींवाहतीविमलांबुधारा । नकोजन्ममृत्ययेरझारा । जगदोद्धारासोडवी ३८ सहच
रीसुवार्ताजाणवीमुखीं । विरूढगृहींएकाएकीं । सद्वृत्तीसद्गदनेत्रोदकीं । पादपद्माचिंतित ३९ उठीमायेतूंसख
रीं । वारंवारशब्दोत्तरीं । तीतेंथापटोनिनिजकरीं । ह्मणेसावधजननीये ४० इच्छिलेकाळींलाभसाधे । तरीउ
देलेंजाणप्रारब्ध । चंद्रवृद्धीसुखआगाध । उत्तरोत्तरहोतसे ४१ विदेशींरत्नअदृश्यझालें । तेंआंगणींप्रगटलें ।
भुजग्रंथींनिक्षेपिलें । संरक्षिलेंहृत्कोशीं ४२ भूमीस्पर्शोनियांभाळ । गृहस्थवदेप्रसादफळ । प्राप्तकेलें

तेंचिरकाळ । चिरंजीवासंरक्षी ४३ सद्वृत्तिलागूनिपायां । ह्मणेकृपाकरीसद्गुरुराया । व्यर्थजन्मगेलावा
या । परत्रसाधनावांचुनी ४४ ऐहिकदिधलेंपुत्रफळ । आतांपरत्रप्राप्तकाळ । ह्मणोनिदेखिलेंचरणकम
ळ । स्वानंदसोहळेपुरवावे ४५ आजिआशीर्वादासरिसें । आजिलाधलेंआपैसें । उत्कंठितहोतोंदर्शनोद्देशें ।
तोउत्साहादिवसआजिचा ४६ जोभवरोगेंपीडिलाप्राणी । त्यासींभेटेगुरुदेवअश्विनी । त्रितापेंसंतप्तगंगाजी
वनीं॥श्रांतिविश्रांतज्यापरी ४७ प्रारब्धाचेअभ्युदयास । लक्ष्मीवरपुसोनियेतसे । चतुर्दिशेयेतसेयश । कीर्ति
घोषमिरवित ४८ तैसेंझालेंजिआजिमातें । कृपाकेलीसद्गुरुनाथें । आळशावरीगंगाप्रवाहते । सुस्नातकरवीनि
जांगें ४९ पश्चात्तापयेऊनिपोटीं । सद्गददतादाटोनिकंठीं । दृढचरणींघालोनिमिठी । पदांगुष्ठपानआननीं
५० हेलावलाकरुणासमुद्र । अवश्यवदतीश्रीमत्स्येंद्र । तात्काळदीधलाउपदेशमंत्र । मस्तकींहस्तठेविला
५१ तोंतिझालीसमाधिस्थ । स्वस्वरूपींउभयदंपत्य । तोंमत्स्येंद्रनाथझालेगुप्त । स्वेच्छागमनअविलंबें ५२
तयेस्थळींअकस्मात । गोरक्षपातलेफिरतफिरत । समाधीविसर्जूनिजाग्रत । द्वारउजूनिराखिलें ५३ सर्वा
तीतअलिप्तवेषी । उभाअसेद्वाराश्रयेसीं । नेणोंस्वदेशीकींविदेशी । पूर्ववयेसींदिसतो ५४ ऐसेंभासेमाझेमनीं ।
देवदानवमानवश्रेणी । ऐसानसेयात्रिभुवनीं । योगचिन्हींमंडित ५५ जेविबाळार्कबाळरेख । विशाळभाळसर
ळडोळस । अतिसौंदर्यरूपेंरूपस । नेत्राआवेशयेतसे ५६ परमात्मावाटेहाकेवळ । बाळभावेंभावास्नेहाळ ।
परिमळरातोत्पळ । चरणयुगुळआरक्त ५७ प्रकाशप्रगटेकोटिभानू । तेविदेदीप्यसुप्रभतनू । वत्सदेखोनिधां
देधेनू । तैसीवृत्तीवेधली ५८ सन्निधजाऊनपाहे । तोंगोरक्षनाथमूर्तीउभीआहे । कंठींकवळूनउभयबाहे । निं
बलोणउतरित ५९ ह्मणेआजिचाधन्यसुदिवस । भेटीझालीउभयतांस । स्वानंदतरूतेंउल्हास । अकस्मात
पातलें ६० पुत्रपाचारोनिसत्वर । करवितेझालेनमस्कार । गोरक्षमस्तकींठेऊनिकर । क्षेमालिंगनदेतसे ६१
गृहस्थवदेपुरलेअर्थ । अवशिष्टराहिलेमनोरथ । तेपुरवीतनाथसमर्थ । कल्पतरूसारिखे ६२ यावरीवदतीमो

रक्षवचन । तुझ्यांघडलेंसर्वसाधन । आतांप्राप्तपदनिर्वाण । पावालतुह्मीअक्षयां ६३ श्रौतस्मार्तवेदाध्य
यन । नित्यनैमित्यअतिथिपूजन । गृहस्थाश्रमसंपन्न । मगवैराग्यकासया ६४ गृहस्थदेतसेउत्तर । गृहीं
नराहेवैराग्यस्थीर । विषयांधहोऊनिनिर्भर । आत्मविचारघडेना ६५ गृहींप्रपंचींघडेसाधन । तरी
कांसेवितीगिरिकानन । दूधशर्करेंरोगशमन । तरीनिंबसेवनकां ६६ ऐकावचनसावधान । प्रपंचींघडेसर्व
साधन । श्रवणमननयजनयाजन । सत्समागमधरावा ६७ दुर्घटवोढवेजरीप्रसंग । तरींनसोडावासत्संग । सत्सं
गतीनेंभवभंग । निश्चयेंसांगहोतसे ६८ निश्चयानेंमहत्साधन। साधतसेआत्मानुसंधान। आत्मसाधनेंनिधान।
नरदेहदेहींविख्यातप्रत्यक्ष ६९ ह्मणालप्रत्यययेईलकैसा । तरीमुख्यधरावीनिराशा । निराशेनेंवैराग्यदशा।
येईलहानिश्चय ७० वैराग्यदशाआलीपाहे । मगदेहींचहोयविदेह। विदेहझालियानिर्भय। ईश्वरचिआपण ७१
ईश्वरझालियाआपण । उडोनिजायदृश्यपण । दृश्यआपणागेलियाजाण । अवघापणब्रह्मास्मि ७२ अहंब्रह्मा
स्मिहोतांपाही । मीतूंपणहाभेदनाहीं । स्वानंदाचेप्रेमडोहीं । निमग्नराहिलेंसर्वदा ७३ तोंवार्ताफांकलीनग
रांत । पातलेयेथेंगोरक्षनाथ । ऐकोनिधांविन्नृपनाथ । पुत्रासवेंयेतसे ७४ पाहूंपातलयापौरजथाटी । जयजय
शब्दबोभाटी । तेथेंस्वानंदाचिघनवृष्टी । आनंदपोटींनसमाये ७५ सप्रेमनृपतीलागेचरणीं । सन्मुखतिष्ठेबद्ध
पाणी । आनंदाश्रूसजलनयनीं । रोमांचस्फुरणसर्वांगीं ७६ राजपुत्रेंकरूननमन । तंवगोरक्षकरितीकृपावलो
कन । बहुतझालेंसमाधान । परस्परेंकरूनियां ७७ तंवश्रीगुरुवदतीपाही । तवपुत्रनामकळलेंनाहीं । राजा
ह्मणेआह्मीसर्वही । नाथप्रसादवदतसो ७८ नृपतीह्मणेएकप्रार्थना । प्रार्थितअसेंदयाघना । तेचिपुरवावीवा
सना । विनवीतचरणाअनन्य ७९ पुरेराज्यनकोआतां । परिणामदुःखमूळपाहातां । नाथदीक्षेचीधरोनि
आर्त्ता । शरणसमर्थापातलों ८० ऐकयादीक्षेचेंकायसुख । घरोघरींमागावीळागेभीक । देहप्रपंचकरो
निराख । अरण्यांतफिरावें ८१ जन्मांतरीआर्चिलापार्थिव । ह्मणोनिझालानरपार्थिव । तुजप्राप्तवैभवगौरव ।

त्यांतअपूर्वहेंदिसे ८२ जन्मांतरींआचरलासीतप । ह्मणोनिझालासीसदैवनृप । कासयाधरिसीअनुताप । योग
साक्षेपकासया ८३ वैभवेंघडेतीर्थयात्रा । दानदेणंघडेसत्पात्रा । अन्नशांतीअन्नपत्रा । घालूनसर्वत्रासंरक्षी ।
॥३॥ ८४ बाहुपराक्रमेंकरून । दुष्टांकावेनिवटून । सुखीकरावेगोब्राह्मण । हाचिबाहुजधर्महा ८५ शरणागताची ॥५॥
पाठीराखी । कीर्तिध्वजउभवीउभयलोकीं । इहपरसाधनलौकिकी । कुळोद्धारकरावा ८६ यावरीवदेनृपनाथ ।
प्रपंचींनघडेपरमार्थ । तरीसायासवायांव्यर्थ । प्रपंचींअनर्थहोतसे ८७ मुख्यनांवप्रपंचयाचें । तेथेंसत्यत्वघ
डेकैंचे । असत्यमानूनिसाचें । अनर्थाचेंकारणहें ८८ मुळीचजन्महाअमंगळ । रजस्वलेचापाहतांविटाळ ।
पितृवीर्यमांसगोळ । वृद्धीपावेगर्भस्थ ८९ विष्ठामूत्राचादाथर । जठराग्नीतेंपचेदुस्तर । अधोमुखींयातना
तीव्र । सोसूनजन्मेअधोगती ९० पाहतांजन्मअधोगती । ऊर्ध्वगतीयोगीपाहाती । मगकेवीघडेऊर्ध्वगती ।
कृपाकरितीतरीबरें ९१ चौऱ्यांशीलक्षजन्मपंक्ती । मागेंझाल्यापुढेंहोती । नाथानुग्रहपुनरावृत्ती । नाहींनाहीं
त्रिवाचा ९२ जयानाथअनुग्रहअसे । तयायमाचादंडसहसानसे । काळभयवागवीतसे । नाथप्रतापअगाध
९३ ह्मणोनियांसद्गुरूनाथा । अनुग्रहद्यावामजअनाथा । भावसदृढनसेअन्यथा । चरणींमाथाठेवितों ९४ शरणा
गतांचाअभिमानी । ऐसीकीर्तीविश्ववदनीं । माझीउपेक्षाकेलीझणी । अनाथनाथमगकैंचा ९५ येरूह्मणती
मार्गकठीण । नपुसेवायांकदांजाण । आतांचीत्यागिसीरत्नभूषण । धुळीघालिसीमस्तकीं ९६ मुक्तुराचिसा
जिरा । अतांत्यागिशीपडेलसैरा । रत्नमाळातोडिशीसत्वरा । सुगंधउपचारात्यागिशी ९७ उत्तरीवस्त्रफाडोनि
गळां । आतांचिघालिसीतूंमेखळा । हाकांभिक्षेचाडोहळा । तुजझालानेणवे ९८ तूंएकुलताएकमायेचा । ॥३॥
कायभोगयायोगाचा । भोगत्यागशतस्त्रियांचा । वियोगत्याचाअयोग्य ९९ गजवाजिशिबिकारथ । राज्यत्याग
करिसीव्यर्थ । नवयौवनस्त्रियांचाअनर्थ । परमार्थकिमर्थकरिसीतूं १०० देशदुर्गनगरेंपट्टणें । त्यागिसीकांमूर्ख
पणें । यायोगाचेंकायघेणें । भीकमागणेचुकेना १०१ लोकेषणावित्तेषणा । दारेषणासंकोचमना । कयकरू

नव्यर्थवल्गना । अनुभवखूणवेगळी २ यावरीनृपवदे वचन । स्त्रियामात्रमातृसमान । विषयाविष वत्धनवमन । सूकरविष्ठेसमराज्य ३ ध्रुवनिश्चयनार्थेपाहोन । वदतीसत्कीर्तीसपुसून । तिचीआज्ञाशास्त्रप्रमाण । योगदीक्षाग्रहणार्थ ४ आज्ञाहोतांतेअवसरीं । जाताझालाअंतःपुरीं । सत्की र्तिनामेंसुंदरी । पट्टराणीज्येष्ठते ५ विरक्तदशाआरक्तनयनी । विकारचेष्ठानसेचिन्हीं । अकस्मातह्मणेजननी । योगदीक्षेआज्ञापी६ ऐसाशब्दऐकोनश्रवर्णी । दचकल्यामगनितंबिनी । कोटीकोसळल्यासौदामिनी । वज्र पातपैंजैसा ७ हाहाःकारएकचिजाहला । वाटेंब्रह्मांडगोळखचला । विरहअग्निअतिपेटला । वचनोक्तींसिंचि लासघृतीं ८ नृपवचननवनीतउंडी । पतनझालीश्रवणकुंडीं । विरहज्वाळामाळीधडाडी । श्वासधूम्रदाटला ९ उदासोत्तरींवायुनळिके । श्रवणरंध्रीयेऊनधडके । धडाडिलादुःखपावक । राखझालीगात्रांची १० नृपति जळदघनबोळला । वैराग्यवातेंझडपोनिनेला । चकोरवृंदतृषार्थिला । अतिबोढवलाप्रसंग ११ अहाप्रारब्ध कटकटा । कांटाकिलेंहव्यवाटा । अरेविधातियानष्टा । दुःखअदाष्टानिर्मिलें १२ अहाविधीकरिसीअविधी । रायासीयोजिलीविपरीतबुद्धी । वज्रलेखजोप्रारब्धीं । नचुकेजाणसर्वथा १३ एकाचिहाहाःकारवोढवला । कायदुःखार्णवचिफुटला । किंवापर्वतकोसळला । अंगावरीआजपैं १४ चंडवातफडत्कारें । कर्दळीपडेपृथ्वी वर । तेविराजललनाएकसरें । भूमींमूर्च्छितपडियेल्या १५ कोणीमस्तकआपटिती । कोणीकेशआक्रोशें तोडिती । क्लेशेंआवेशेंताडिती । मस्तकस्तंभींसरोषें १६ भळभळांवाहेरुधिर । प्रळयकाळवोढवलाथोर । दुःखार्णवआवर्तीदुस्तर । कितीविस्तारवदावा १७ एकानेत्रधारासतत । पयोधरलिंगाअभिषेकित । मोठा वोढवलाअनर्थ । अपारसिंधुसारिखा १८ एकीधाऊनधरीचरण । एकदेतआलिंगन । एककरीअवलोकन । मुखेंम्लानकरूनी १९ प्राणप्रियाप्राणनाथा । प्राणसखयाआत्मनाथा । त्यागोनिजासीयोगपंथा । आ लेंउचितहेंमाझ्या २० तूंतोंसाधिसीहितपरमार्थ । आमुचाकरोनिजासीघात । कळलेंआह्मांमनोगत ।

कूपांतदोरकापिसी २१ धर्मेंअर्थेंचकामेंचपाहीं। देवद्विजसाक्षिअग्निही । त्याचापरिणामऐसानाहीं । विचा
रीकांहींमानसीं २२ स्त्रियेसंगेंस्वधर्मराहे । श्लाघ्यगृहस्थाऐश्वर्य । वीर्यशौर्यऔदार्य । सर्वळाहेस्त्री
संगें २३ यावरीवदेनृपसत्तम । स्त्रीपुरुषादिभासभ्रम । आत्माविगळासर्वोत्तम । तोपुरुषनपुंसकस्त्रीनव्हे ॥५॥
२४ कोणकोणाचीजनकजननी । कोणकोणाचीप्रियकामिनी । कोणकोणाचीसुहृदभगिनी । गृहमंदि
रकोणाचें २५ कोणकोणाचामित्रपुत्र । कोणकोणाचीकन्याकलत्र । कोणकोणाचेंकुळगोत्र । आत्मास्वतंत्रवे
गळा २६ कोणाचेंराज्यकोणाचेंधन । व्यर्थवाहतोअभिमान । विषयासक्तसूकरश्वान । तेविरमतीदिननिशीं
२७ ऐश्वर्यसंपत्तिराज्यादिक । हेंसर्वभासेमजमायिक । वित्तआयुष्यक्षणिक । कांहींविवेकस्मरेना २८ मुळीं
चशरीरहेंकुश्चिळ । चर्मपोतडीनरकअमंगळ । हाडेंनाडीश्लेष्मानिखिळ । शुद्धकेवळनसेची २९ अप्रयोजकनिर
र्थकदेह । साधनकेलियाकायनव्हे । जीवाचाशिवहोतसेपाहे । गुरुकृपासाह्यझालिया ३० सद्गुरूसगेलियाशरण ।
चुकवीतसेजन्ममरण । याचिदेहींप्रचितीजाण । प्रत्यक्षप्रमाणकासया ३१ तुह्मीआपुलास्वार्थपहातां । मी
तोंजातसेंनिरंजनपंथा । तुह्मीसर्वमिळोनिमाता । आज्ञाद्यावीमजप्रती ३२ स्त्रियांसींपुसूनसत्वर । निघताझा
लानृपवर । रुदनकरितीदीर्घस्वरें । कांताआक्रांतएकांतीं ३३ एकभूमींभाळआपटिती । मृत्तिकावदनींघालि
ती । एकीसक्रोधधुळीचर्चिती । विटंबितीदेहातें ३४ एकह्मणतीहाजोगडा । कोठोनिआलाकानफाडा । आ
मुचाभ्रतारकेलावेडा । मोहनीघातलीपैं ३५ नृपेंबुद्धीधरोनिगाढ । गोरक्षचरणींमस्तकदृढ । ठेवूनिवदेमागं ॥४॥
पुढें । सबाह्यरोकडगुरुरूप ३६ क्षणिकचित्तवित्तजीवित्व । जाणूनिपातलोंशरणत्वरित । आतांहोऊनिसमर्थ ।
दीक्षापंथदेइजे ३७ मनेंद्रियाकायावाचा । संकल्पकेलासर्वस्वाचा । झालोंअधिकारीयोगाचा । निश्चयसा
चधरोनी ३८ मुकुटकुंडलेंअळंकार । फिरकाविलींएकसरें । मनहोऊनिएकाग्र । अनुरागत्यामजाहला ३९ मग
पदत्रयाचेंपूजन । करिताजाहलानृपनंदन । मंगळजननीचेंआराधन । मंगळप्रदकरीतसे ४० ज्ञानशलाकाप्र

ज्वाळित । श्रवणींघालोनिमुद्रास्थापित । उन्मनीवस्त्रेंआच्छादित । अगाधमंत्रदीधला ४१ भस्मचर्चूनास
र्वांगीं । काषायभूषितभव्ययोगी । समंत्रकदेतशैलीशृंगी । झोळीफांकडीहस्तकीं ४२ अलक्षोच्चारकरीवदनीं ।
सत्वरजाईमातृसदनीं । भिक्षामागूनयेक्षणीं । सोहंस्मरणींअसावें ४३ नामठेविलेंविजयनाथ । कुळतरींआदि
नाथसमर्थ । पंथश्रेष्ठनाथपंथ । धर्मनिर्गुणबोलती ४४ घेऊनियांनाथदीक्षे । मगजातसेमातृभिक्षे । राज्यपदीं
पुत्रास्थापित । गुरूआज्ञेपैं ४५ सिंहासनींविजयीपुत्र । मस्तकींवरचीसुवर्णछत्र । मंत्रीपाचारोनिसर्वत्र ।
अर्पितीतेराजमुद्रा ४६ इकडेराजालयींयेऊन । मातेसकरूनियांनमन । अलक्षशब्दउच्चारून । भिक्षामागे
जननीतें ४७ पुत्राचेंवैराग्यदेखून । राजमाताकरीरुदन । कांत्यागिसीराज्यसदन । तीतेंवचनबोलत ४८
जननीतुझेउदरींयेऊन । माझेंचुकलेंजन्ममरण । श्रीगोरक्षकृपेंकरून । चिरंजीवजाहलों ४९ सकळझालाकु
ळोद्धार । चुकलामाझायमप्रहार । ब्रह्मीभूतहोऊनिशरीर । स्वयंब्रह्मजाहलों ५० झटकूनिनिघेतोसत्वर
गती । तेथूनिजातसेसहजस्थिती । तंवस्त्रियाधांवोनियेती । वेष्टूनघेतीतयातें ५१ त्यागूनजासीप्राणना
था । दुर्धरदंडकांआह्मासअनाथा । मारूनजाईसत्वरआतां । नव्हेअन्यथावाणीही ५२ कांहींअपराध
नसोन । आमुचाघेऊंपाहसीप्राण । प्राणेश्वरातुजवीण । शरणकोणाजावेंपां ५३ वियोगदुःखदुर्धर । न
साहतीहेदुर्वारशर । विकळपडतीपृथ्वीवर । उभेशरीरटाकिती ५४ शरणागताचाकरूनिघात । यांतसाधि
सीकायपुरुषार्थ । प्राणसख्याचेंकठोरचित्त । केविझालेंकळेना ५५ आह्मावेगळाएकक्षण । निमिषजातसेयु
गासमान । ऐसेंअसतांहृदयकठीण । कांझालेंकळेना ५६ अखंडजयाचीसमाधिस्थिती । इकडेस्त्रियाविलाप
करिती । देहींनसेतयाक्षिती । अव्यक्तव्यक्तींवर्तत ५७ निस्पृहजयाचेंअंतःकरण । कर्णनिर्विषयजयाचेमन
। निःसंगनिरभिमान । निर्द्वंद्वअभेदविचरत ५८ स्त्रियाआंदोळतीकुचसंलग्न । परीविकारींनुठेजयाचेंमन ।स्व
रूपींअखंडदंडायमान । विकारकोठेंनहोत ५९ भार्यावदतीनृपवर्या । केशींझाडूंतुझ्यापायां । रुष्टहाऊनकोप

कासया । प्राणत्रिसांध्यागुणाब्धी ६० अरेभूपाळाजोगिया । आह्मांकरीतूंजोगिणिया । सेवाकरोनिराहूंपायां ।
वायांत्यागिसीआमुतें ६१ तिरस्कारोनिवदेवदनीं । भिक्षाअणावीसत्वरजननी । हाहाःकारोनियांभामिनी ।
रुदनकरितीसर्वही ६२ निघेतेथूनिसत्वरगती । वैराग्येंपातलापुनरावृत्ती । नमस्कारोनिनाथमूर्ती । आज्ञामागे
पुढारीं६३गुरुवदतीकरीतीर्थाटण । अनेकसिद्धनाथदर्शन । घेऊनयेईपरतून । बदरिकाश्रमापाठवूं६४आज्ञा
वंदोनिनिघेतेक्षणीं । रुदनकरितीपौरजश्रेणी । पुत्रप्रधानमिळोनी । बोळवीतजातसे६५सद्बोधपुत्रनाथ । राजपुत्र
नाथवरद । उभयप्रीतींअभेद । एकोदरासारिखी ६६ असोइकडेगोरक्षमुनी । निघतेझालेतेथूनी । सर्वेनाथव
रदासघेउनी । सद्बोधवृत्तिसमवेत ६७ तेथूनानिघालेसत्वर । उभवितेझालेगोरक्षपुर । तेथेंस्थापीवरदनृपवर ।
राज्यदीधलेंतयातें ६८ सद्बोधसद्वृत्तीप्रती । नाथसांगतीकरावस्ती । राजयोगयथानिगुती । सांगतेझालेसम
र्थ ६९ उभयतांह्मणतीनाथासी । आह्मीराहूंअरण्यवासी । किंवाआज्ञाबदरिकाश्रमासीं । देइजेजीआमुतें ७०
गोरक्षवदतीकासयासाधन । व्रततपनलगेपुरश्चरण । अंतींपदानिर्वाण । प्राप्तहोयनिश्चयें ७१ अयोध्यासंनि
धगोरक्षपुर । आद्यापिआहेक्षेत्रपवित्र । रजतताम्रमुद्रासुंदर । गोरक्षनामेंचालती ७२ नाथपंचमोध्यायीं
जाण । साक्षात्सांबपंचवदन । कींपंचायतनपूजन । श्रवणमननेंघडेपैं ७३ पंचमतत्वजेंनिराळ । तेंचियोगि
यांचेंविश्रांतिस्थळ । तेथूनभेदितसूर्यमंडळ । अध्यायकेवळतोअसे ४७ श्रीमतआदिनाथलीलासुरस । भैर
वपदींआदिनाथदास । ग्रंथपावनपरमरहस्य । पंचमोध्यायींवंदितों ॥१७५॥ इ॰पंचमाध्यायसमाप्त ॥ ५ ॥





श्रीगणेशायनमः ॥ श्रीनमोआदिनाथमत्स्येंद्रा। श्रीगोरक्षाचित्समुद्रा। भवनाशकाप्रतापसमुद्रा। भद्रकारकास
द्रुरू१शिवावतारमत्स्येंद्रस्वयें। गोरक्षतोविष्णुनिश्चयें। चतुराननचौरंगीअंशमय। विश्वोद्धारप्रगटलेरधन्यध
न्यतेमहीमाझारीं। योगीजनाविजनविहारी। निमग्नसदाअभ्यंतरीं। जगदोद्धारीविचराति २ जोसद्गुरुभक्तिपराय
ण। तेथेंभुक्तिमुक्तिकल्याण। दुर्घटसंकटेंनासतीदारुण। अकाळमरणनबाधी ४ जयाचागुरुपदींविश्वास।
प्रारब्धेंनेलेंविषमस्थानास। तेथेंजयापावोनियश। मान्यहोयसर्वांतें ५ पाहेउतंकगुरुआज्ञेन। प्रवेशलापाताळ
भुवन। आणूनियांकर्णभूषण। पुण्याहवाचनीं अर्पित ६ असोगतकथाध्यायींइतिहास। विजयनृपासींदीक्षाउपदे
श। देऊनियांगोरक्षपुरास। येतेझालेस्वभावें ७ एकाश्रोतेसज्ञाननर। रुद्रपुरीनामाख्यनगर। तेथेंभुलेश्वरनामा
नृपवर। परमप्रतापीभूभुंजतो ८ चंद्रावतीतयाचीप्रियकांता। चंद्राननांपतिव्रता। सुंदरचातुर्यलावण्यस
रिता। प्रीतीउभयतांअद्वय ९ दुष्टदमनींवैश्वानरें। प्रजेविषयींकरुणासमुद्र। धीरवीरप्रतापसमुद्र। शीतळचं
द्रासारिखा १० औदार्याविषयींजेंविकर्ण। योद्धाजेविंप्रतिअर्जुन। सुखीरक्षींगोब्राह्मण। साधुसेवनींअतित
त्पर ११ कोणेएकेदिवसींजाण। वनविहाराकरीगमन। चतुरंगसेनासिद्धकरून। चमूसंपन्नजातसे १२ नग
रगर्भातूनिमिरवत। जातसेसंभारसमवेत। नगरस्त्रियाविलोकित। मंदिरींगोपुरींवळंघुनी १३ आर्धीचसौंदर्य
रूपाथिला। अळंकारसुवस्त्रींअतिडौरला। पहावयास्त्रियांचापाळा। मेळामिळालासत्वर १४ सुस्वरूपदें
दीप्यमान। स्त्रियानिरखितीरतिरमण। मनोमृगदीधलापंचबाण। कटाक्षमार्गेंमूर्छित १५ तुष्टपुष्टबळसौंद
र्य। ऐश्वर्यआणिवीर्यशौर्य। पाहोनिदीपपतंगन्याय। झेंपावितीपरपुरषीं १६ एकवदेधन्यजननी। ऐसेंर
त्नप्रसवलीमेदिनीं। एकनिरखोनयनीं। सोमकांतापरिद्रवे १७ एकवर्णींस्वरूपसौंदर्य। एकवदेधन्यऐश्वर्य।

१ ब्रह्मदेव. २ राजा. ३ स्त्री. ४ चंद्रमुखी. ५ अग्नि सारखा. ६ नगर द्वार. ७ तेजःपुंज. ८ काम.

।.ली एकाह्मणतीकष्टाचातुर्य । याचेदेहींविसावलें १८ एकवदेजन्मांतरीं । अर्चिलीअसेलशिवगौरी । तरीजोडानि अ०
र्द्धारी । ऐसावरलाधिजे १९ एकह्मणेअहोबाई । आपुलेप्राक्तनशुद्धनाहीं । पतिसुखावांचणपाही । सदांदाहीचिं
॥१॥ ताग्नी २० प्रपंचसुघडअसावासांग । याहूनभलेंमगवैराग्य । ईश्वरींधरूनअनुराग । जन्मसार्थककरावें २१ ॥६॥
एकवदेऐसेंनोहे । आपुलाभ्रातारईश्वरहोय । त्यावेगळेंऐश्वर्यकाय । असोनियांजाळावें २२ कुळाभिमानीसत्कु
ळस्त्रिया । कुळींनवर्ततीऐशाजाया । कुळवंतसंपत्तिऐश्वर्या । मानूनवर्तेकुलांगना २३पूर्वार्जितेंअर्चिलाईश्वर ।
तोचिईश्वररूपभ्रतार । त्याचेंसेवननिरंतर । तेकुळोद्धारीपतिव्रता २४ आपुलापतिसर्वोत्तम । आपुलापति
पुरुषोत्तम । पतिव्रतेचाहाचिधर्म । नेमनिःसीमसेवेचा २५ भ्रतारमानावासर्वोत्कृष्ट । ऐश्वर्येंनृपजरीश्रेष्ठ । कां
चनापुढेंजविलोष्टं । तेंविंदृष्टीपाहावा२६होकांसमर्थाचींमंदिरें । आणिआपुलींतृणागारें । परिवास्तव्यासितेचिबरे
रे । कायइतरकरावीं२७असोआपुल्यानगरींचाभूप । आपुलाप्रजेचामायबाप । विवेकेंदर्पेंकंदर्पसर्प । विवेकमं
त्रेंआकळावा२८असोमृगयेसराजचूडामणी । जातांपाहतीपौरजश्रेणी । पुढेंधांवतीवेत्रपाणी । सत्कीर्तिवर्णिती
तयाची२९नगरप्रदेशींदळभार । जातसेसेनासमुद्र । पुढेंअरण्यअटवीदुर्धर । घोरकंदरेंदेखिलें ३० तंवमृगसा
वजेंदेखिलींदुरी । वीरांतेंनृपतिआज्ञाकरी । हेमृगवधोनिसत्वरी । नगरींजाऊंआपुल्या ३१ अश्वधांवडितीमृग
पृष्ठीस । तेपळालेचौदिशेस । प्राणभयहोऊनिपशूंस । पळोनजातीदशदिशा ३२ त्यांतूनएककुरंग । रायेंउजूजा
यसवेग । द्वांविभरोनियांमृग । पाठलागकरीनृप ३३ वल्गयसारोनिस्वहस्तें । ग्रीवाथापटोनिपादांग्रिसंकेत । हयप
वनवेगेंगमनकरित । मृगपृष्ठींसत्वर ३४ किराणमारूनजायसत्वरहारिण । मागेंराजामारीतबाण । त्याचेंचुकवोनि
संधान । पुढेंगमनकरितसे३५जवळपाहतांजायदुरी । हांवेंधांवेवनगव्हरीं । अकस्मातदेखिलीपुढेंदरी । जायमी
तरींतोमृग ३६ चमूगेलीएकीकडे । राजाजायतयापुढें । आवेशलाहावेढें । वननिबिडदेखोनी३७तंवजाळींतू ॥१॥

१ भी.वि. २ पति. ३ लोखंडी. ४ पर्णकुटी. ५ विचार. ६ रान. ७ हातील कडे.

निनिघेमृग । रायेंकरोनिपाठलाग । बाणींखोंचलासर्वांग । परत्रेपावलामृगतो ३८ रावनृपाक्रांतश्रांतला । अशोकवृक्षींविश्रांतिला । तोंऋषिपुत्रएकदेखिला । समिधार्थआलात्यावनीं ३९ रायेंनमस्कारोनितयातें । ह्मणेदुरळवनींपातलाएयेथें । येरूवदेतोतयातें । समिधाग्रहणींहवनार्थ ४० तयासवदेनृपनंदन । येथूनसमीप कींदूरजीवनं । येरूतर्जनीसंकेतेंकरोन । जवळीआहेहेंपाहे ४१ तेथूननिघेराजकुमर । तोंअरण्यदेखिलेंसुंदर । रम्यआराममनोहर । पक्षीवृक्षींबैसले ४२ निबिडवृक्षसफळफळले । चूतचंपकचिंचिगीआंवळे । न्यग्रोधें औदुंबररसाळे । वायुवेगेंडोलती ४३ तालतमालव्याळसरळ । पोफळीबकुळीनारिकेळ । सुवर्णकर्दळीसदाफळ । दाळिंबीसफळइत्यादी ४४ चंदनरातांजनदेवदार । फणसआणिमांदार । अश्वत्थकपित्थकेतकीसुंदर । जंबुजं बीरेसींघनते ४५ शुकपिकपिंगळेअनुवादती । सहंसशिखीबोलती । चक्रवाकबकउड्डाणघेती । कारंडवादिविहंग म ४६ समीपतडागजळसुंदर । आंतजळअसेपुष्कळ । नीळवर्णीअतिसोज्वळ । कमळेंजळींविकाशती ४७ सहस्रदळेंरातोत्पळें । चंद्रोत्पळेंनिखिलधवळें । रुंजीघालितीअलिकुळें । झंकारशब्दींबोलत ४८ तडा गतटपाटांगणें । पुष्पवाटिकासुगंधसुमनें । अळींभरलीसंपूर्णजीवनें । परिमळपवनेंकोंदला ४९ बकुळीपाट लीशेवंती । नागपुन्नागआणिमालती । जाईजुईसुगंधसेवती । मुक्तमोगरेविराजती ५० असोरायेंकेलेंउदक पान । जळस्पर्शेंनेत्रपुसोन । वृक्षातळींबैसोन । विश्रांतीघेतक्षणभरी ५१ तंवनगरास्त्रियायेतीजीवना । लावण्यदेखिल्यादिव्यांगना । विलोलनेत्रीचंद्रानना । भूपसौंदर्यावेधल्या ५२ सायकसोडोनिकामेश्वर । पंचबाणींवेधलेशरीर । खोंचोनियांहृदयाजिव्हार । मनोहरणींवेधल्या ५३ रायापुसतीकोठोनिगमन । को ठेंजाणेंकायकारण । नामनगरदेशस्थान । श्रवणकेलेंपाहिजे ५४ अन्योन्यबोलतीसख्यांप्रती । छप्प न्नदेशींचेचक्रवर्ती । आलेविवाहाधरोनिआर्ती । परीनपावतीसरियाची ५५ राजगृहींविवाहआहे । परि

---

१ मृत्यु. २ उदक. ३ बाग. ४ आंब्याचेंवृक्ष. ५ वटवृक्ष. ६ मोर. ७ फुलाची बाग. ८ सुगंध.

ली. राजकन्येसवरयोग्यहोये । जरीप्रारब्धेंतोसीलाहे । तरीथोरदैवेंदैवाची ५६ उदयीकलग्नसमयतेव्हां । माळ अ०
घालीलकोणासदैवा । पाणिग्रहणकोणासितेव्हां । ब्रह्मसूत्रकळेना ५७ नगरजनापुसेभूप । त्यानमराचाकोण
॥२॥ नृप । पुसताझालाअतिसाक्षेप । नगरलोकांतेकाळीं ५८ ऐकाएकाग्रसविस्तर । चंद्रावतीहेनामेंनगर । ॥६॥
येथेंसुभद्राख्यराजेश्वर । परमप्रतापीभूमंडळीं ५९ त्याचीकन्याशुभावती । तिचेस्वयंवरापातलेनृपती ।
स्वरूपलावण्याचीख्याती । विश्ववदनीवदनसे ६० उदयकिअसेलग्नसोहळा । सर्वत्रपाहूंगातलेडोळां । माळ
घालीलकोणाभूपाळा । जाणवेलसर्वतें ६१ जेंविदमयंतीस्वयंवरासी । देवमानवसमारंभेसीं । येतेझाले
स्यास्थळासीं । परमउत्साहीपै ६२ असोसख्याभरोनिजीवन । जात्याझाल्यानलगताक्षण । राणीवसांत
येऊन । राजकन्येसीबोलती ६३ उदयीकतुझ्याप्रात्क्तेनाची । परीक्षानेमिलीअसेसाची । वरयोजिला
योजनेची । ईश्वरसिद्धकरोतें ६४ उदंडेपुरुषपृथ्वीवर । ब्रह्मसृष्टींचराचर । परीऐसाशोधितांदुजानर । भू
मंडळींहिदिसेना ६५ अतिदेदीप्यदिव्यदीप्ती । गौरवर्णसुप्रभकांती । मुक्तालंकारेंमिरवती । रतिपतीदूसरा
६६ एकोनवेधलीअंतःकरणी । केव्हांमीपाहेननयनीं । ऐकिलाऐसाअसेलाचिन्हीं । प्रातहोईलमजकैसा ६७
नकळतघेतसेपुरुषवेष । आश्विनीआरोहणकरीतसे । सर्वनृपांतेंपाहतसे । गुप्तरूपेंकरोनी ६८ मगयेवोनित
डागनिकटीं । राजयातेंनिरखिलेंदृष्टीं । हाचिहोयानिश्चयपोटीं । करितिझालीशुभांगी ६९ परस्परेंपाहोननयनीं
खूणबाणलीअंतःकरणीं । रायेंवोळखोनिस्त्रीचिन्हीं । मौनमुद्राअवलंबी ७० हास्यकरोनिपरस्परीं । सलज्जपा
हेतेसुंदरी । विनवीतसेमधुरोत्तरीं । अर्धांगइच्छीमानस ७१ रायासपुसेकेठीलकोण । येरूह्मणेकायकारण । ॥२॥
नामगोत्रासपुसोन । कायलग्नलावणें ७२ नृपलावण्यपरिमळचंदन । वेधेंवेढीजेविंसर्पीण । तेंविसलग्रहोऊनिमन ।
भूपवेधेंवेधली७३विषयांधहोऊनिनृपवर । तीतेंवदेशपथोत्तर । तुजवीणमजाप्रियकर । पदार्थीप्रियअसेना ७४ तये

१ देव. २ बहुत. ३ दुसरा. ४ मोत्यें ५ कामदेव. ६ प्रतिज्ञा भाषण.

संधीवदेवचन । मजदेईभाष्यदान । रावपुढेंसरसाऊन । भाष्यदेततयेतें ७५ ईश्वरमायेचेंकौतुक । कदांनचु
केआवश्यक । कैकयीतेंवचनदेख । जेंविंदशरथदेतसे ७६ होणारहोतसेअनायासें । कांहींनकरितांप्रयास ।
देहप्रारब्धनचुकेकोणास । सत्यसत्यत्रिवाचे ७७ जाणतेपुरुषआचरतीअविधी । पूर्वसंचितजेंप्रारब्धी । जोने
मनेंमिलाविधीं । नहोयअविधीतयासीं ७८ मोहिनीनेंमोहिलापिनाकधर । मोहिनीनेंमोहिलारुक्मांगदवीर ।
तैसाचझालाप्रकार । वचनींनृपवरगुंतला ७९ असोउदयिकिहासंकेत । रंगमंडपींयेऊनतेथें । माळघालीनमी
स्वहस्तें । पैर्णूनन्यावेंमजप्रती ८० अन्योन्यखूणपरस्परें । सांगोनपातलींअंतःपुरें । मंगळध्वनीवाद्यगजरें ।
निरंतरहोतसे ८१ तोंसुपर्णाग्रजँउदय । दैन्यसरतांअभ्युदय । तमनाशकज्ञानसूर्य । प्रकाशतज्यापरी ८२
असोमंडपउंचदीर्घसुंदर । मखरेंतोरणेंमनोहर । शोभेसमविडौजमंदिर । चित्रविचित्रचित्रादी ८३ ऐसाशृंगा
रिलासभामंडप । मिळालेछप्पन्नदेशींचेभूप । वधूदेखोनिज्योतिरूप । झेंपावेपतंगज्यापरी ८४ नृत्यांगना
नृत्यकरिती । उदकेंकारंजीरंजविती । सुगंधउपचारअर्पिती । परिमळभूषणेंपुष्पादी ८५ नृपएकाग्रेघिलें
चित्तें । अरुचीउपचारनरुचत । जेंविपयनवर्ज्यारतातें । तेंविउपभोगतयासीं ८६ ऐसेसंधिसिद्धजाण । भुले
श्वरचमूमिळालीयेऊन । सर्वसमुदायसज्जहोउन । सभामंडपींपातले ८७ रावसामोराजाऊनत्यांस । अतिस
त्कारेंआणीतसे । अभ्युत्थानतयास । देतेझालेसर्वही ८८ सिद्धहोऊननृपवर । तीतेंन्याहाळितएकसरें ।
ह्मणतीकृपाकरीलजगदीश्वर । तयासप्राप्तहेंरत्न ८९ हस्तीचेशुंडेमाळा । नेणोघालीलकवणाचेगळा । भूपाळ
झालेसर्वगोळा । डोळातिकडेलावोनी ९० तयेकाळींहारावळी । तात्काळराजकंठींसूदली । सर्वत्रांसीभुली
पडली । राजेपाहतीतटस्थ ९१ ऑपुण्याहह्मणोनिलग्न । यथाविधिपाणिग्रहण । नृपेंअर्पिलेंअपारआंदण ।
दासदासीगजवाजी ९२ एवंचाऱ्हीदिवसलग्नसोहळा । जामातपाहोनिनृपतोषला । द्रव्यकोशमुक्तकेला ।

१ पूर्वजन्मीचे कर्म. २ शंकर. ३ वरुन. ४ अरुण. ५ इंद्र.

धर्मझालायाचकां ९३ यावरीवधूसाध्यनरेशा । श्वशुरापुसोनिजायस्वदेशा । सर्वेंनृपांचीअतृप्तआशा । 
 जातीस्वनगराआपुल्या ९४ बाह्यगजरेंनगरांतुनीं । जाताझालासहकामिनी । रायेंजामाताबोळउनी । राजा
लयींप्रवेशला ९५ रावआलाऐकोनिनगरा । प्रधानपातलासामोरा । आनंदनगरजननारीनरा । होतांझाला ॥५॥
सर्वांतें ९६ नगरींरंगमाळारेखिती । ध्वजउंचमंडपउभारिती । अक्षयवाणेंमृगाक्षीकरिती । नितंबिनीनगरीं
च्या ९७ मंगळवाद्यमंगळगाणी । वारांगनानृत्यध्वनी । शोभायमानमंगळजननी । होतीझालीनेधवां ९८
असोयापरीलग्नसमारंभ । नृपेंमानूनिकृतार्थलाभ । वल्लभाआणिवल्लभ । प्रीतीउभयअद्वय ९९ ज्येष्ठभगिनी
सींकरोनिनमन । राहतीझालीप्रीतीकरून । कांहींदिवसलोटतांजाण । तोंविचित्रवर्तलें १०० सापत्नबुद्धिसं
ताप । संतप्तहोयतीव्रताप । उत्तरोत्तरहोयसकोप । द्वेषवल्लीउदेली १ परीचंद्रावतीचेमनीं । द्वेषनसंअंतःक
रणीं । जेविगंगासोज्वळजीवनीं । अणुमात्रमळअसेना २ कोणेएकेदिवसींजाण । राजाकरीतअसेभोजन । तों
चंद्रावतीचेंहिअन्न । पक्वान्नआणवीप्रीतीनें ३ आवडीदेखोनिज्येष्ठेची । द्वेषबुद्धीउदेलीसाची । प्रीतिदेखोन
उभयतांची । नेणेंक्षोभेअंतरी ४ चिंताग्निज्वाळातीव्रभारी । द्वेषेंवेढलीतेसुंदरी । उद्विग्नसदाविचारविवरीं ।
संतापेंव्याप्तहोतसे ५ खदिरांगारशेजेसीं । सुखनिद्रायेईलकैसी । तेतळमळीतअहर्निशीं । पैशून्यलक्षीति
येचें ६ परीतेमहासत्वअद्वेष्टी । द्वैतनपाहेचिदृष्टीं । कृत्रिमकापट्यनसेपोटीं । स्वधर्मेराहटींवर्तत ७ रायेंके
लाद्वितीयसंबंध । ह्मणोननकरोतियेसविरोध । पतिसेवानिरंतरअगाध । पतिप्रियतेंचिवर्तत ८ एकेदिनीएकां ॥३॥
तस्थानीं । कांतकांतारमतीदोन्ही । आलिंगनचुंबनमैथुनीं । क्रीडाकरितीआनंदें ९ हर्षानंदक्रीडारस ।
त्यांतकाळवितीझालीविष । बोलोंसरसावलीसरोष । त्रासउद्भवेजयातें १० तुह्मीधीरवीरसर्वज्ञ । कीर्तिध्व
जउभविलाजधन्य । परिचंद्रन्यायलांछन । जनींदिसोनयेतसे ११ तुमचाप्रियपदार्थतोउच्छिष्ट । दृष्टीस

१ वडील बहीण. २ नमस्कार. ३ खयराचे निखारे.

आलाअतिभ्रष्ट । तेथेंप्रीतीतरींउत्कृष्ट । दुष्टअदृष्टउदेलें १२ एकोनिचटपटीतसवेगीं । जेंविंद्याश्चिक वेधेंसर्वांगीं । कारागृहाचेविवरदुर्गीं । पडताझालाभूपती १३ रावपडेसंशयावर्तीं । मौनस्थग्रहणींनच लेस्फूर्ती । क्षीणहोऊनियांनृपती । मनोवाजिथोकला १४ नकरावाकोणाचाविक्षेप । ह्मणोनकरीहासाक्षेप । धर्म शास्त्रींमहत्पाप । ह्मणेगौप्यअसावें १५ प्रियपट्टराणपिट्टांगना । तिचीनसावीदुष्टवासना । प्रियपात्रतुमचेआ वडेमना । परीप्रीतीतिचीपरपुरुषीं १६उदयीककळेलहेंचरित्र । परिगुप्तअसावागुह्यमंत्र । वाच्यांशनकरावाअ णुमात्र । अदृश्यचरित्रदृश्यहोय १७ एकोनियांरायासींचढलाक्रोध । आतांकैचाइजसींसंबंध । दुष्टापराधेंइ चावध । प्रधानाहातेंकरवितों १८ रावप्रधानाआज्ञापित । चंद्रावतीन्यावीअरण्यांत । तीतेंवधोनियात्वेंवारि त । आज्ञाकरितोंत्रिवाचा १९ मदांधअविवेकअविचार । विषयासक्तझालानृपवर । स्त्रैणहोऊनिदुर्धर । न्या यअन्यानयपाहे २० प्रधानेंआज्ञावंदोनी । निघताझालातत्क्षणीं । राणीवसाराजभुवनीं । येताझालातेवेळीं २१ तोंचंद्रावतीस्वलीलेंकरून । बैसलीअसतांपाहेप्रधान । त्यासिह्मणेकिमर्थगमन । आजकेलेंप्रभातीं २२ प्रधा नह्मणेमाहेराप्रती । जावेंआज्ञापीनृपती । तंवविचारकरीतसेचित्तीं । अपराधकांहींनाढळे २३ स्वामीआज्ञाप्र माण । उठतीझालीत्वरेंकरुन । रथींकरोनआरोहण । सारथीप्रधानहोतसे २४ मनींविचारीपूर्वप्राक्तन । कां हींअपराधनसोन । कायरायासआलेंदिसोन । हेंहीनकळेमजप्रती २५ नगरनारिकनरनारी । ह्मणतीपतिव्रता हेसुंदरी । जेंविसुलोचनाहेदुसरी । कींकयाधुयावाटतसे २६ जेवींकैकेयीवचनेंकरोन । रामजानकीतेंअजनंदन । करविताझालावनींगमन । तेवीदिसोनयेतसे २७ घडघडाटवेगेंकरून । चंचळत्वेंजातसेस्यंदन । जातां देखिलेंघोरकानन । माध्यान्हकाळहोतसे २८ वृक्षपक्षीनसेजीवन । घोरकांतारभयंकरविपिन । प्राप्तझालींतृ षेंकरून । उदकपानमजकरी २९ षष्ठममासाचागर्भउदरीं । सत्वरमजजळपानकरी । प्रधानह्मणेतेअवसरीं । उदकशोधाजातसें ३० चित्तींविचारीप्रधान । हीअन्नदातामातेसमान । तशांतहीआहेगर्भिण । स्त्री

 ज्ञप्तिरूपेंमात्रउरलें । उरलेंसरलेंतयानें ७३ अखंडदंडायमानमन तेंमनचिझालेंउन्मन । तेथेंकैंचेंध्येयध्या 
ताध्यान । द्वैतभानमावळे ७४ मीतूंपणासीनसेठाव । तोंतवदेहभावझालावाव । राजयोगाचाहावैभव । अनिर्वा
॥३॥ च्यसांगतां ७५ असोदूतदूतिकाविनविती । चित्तींपाहतीविदेहस्थिती । दारुप्रतिमातटस्थवृत्ती । देहभास ॥९॥
भासला ७६ उशीरलागलाह्मणून । दुसरेसेवकप्रेरिलेजाण । तेहिराहिलेगुंतोन । तटस्थपणेंतिष्ठती ७७ तोंदुजा
सेवकसत्वर । नामतयाचेंदुर्धर । परमदुष्टदुराचार । कींदुःशासनचिदूसरा ७८ रावत्यातेंआज्ञाकरी । तुवांजाऊन
तेथवरी । तिचीसर्वथाभीडनधरी । एथेंआणीममाज्ञा ७९ अवश्यह्मणेतोदुर्मती । शीघ्रजायसत्वरगती । तीतें
ह्मणेतुजनृपतीं । पाचारिलेंअविलंबें ८० तंवसतीनेदीप्रतिवचन । मगकायकरीतोदुर्जन । मस्तकींचाअंचळवोढो
न । वेणधरिदुष्टतो ८१ स्पर्शकरितांतेवेळा । वस्त्रांतूननिघतीअग्निज्वाळा । भडभडाटेजेवींचपळा । आंगींख
डतरझोंबती ८२ जेंविंमुचुकुंदशरीरींचेंवसन । काढितांदग्धकाळयवन । कींदमयंतीचेशापेंकरून । भस्मझाला
निषाद ८३ तैसाजळालादुर्मद । जेंविंशंकरक्षोभेंकामदग्ध । नाथमहिमाअगाध । लीलावतीचाअभिमानी ८४
हाहाःकारएकचिझाला । महाकल्पांतवोढवला । नृपाळबहुतघाबरला । मत्स्येंद्रमहिमादेखोनी ८५ जेंविंअनु
ष्ठानसिद्धकाळ । देवताप्रगटेतत्काळ । तेंविंमत्स्येंद्रउतावेळ । येतेझालेसद्गुरू ८६ नृपधांवूनलागेचरणीं । त्राहि
त्राहिआननींध्वनी । मांपाहिपाहिइहींवचनीं । सद्गदहोऊनवदतसे ८७ भावेंजोडोनिउभयकर । प्रार्थीतसेवारंवा ॥३॥
र । मीपरमपतितदुराचार । कराउद्धारपैंमाझा ८८ मगमालतीराणीयेऊन । मत्स्येंद्रातेंशरणअनन्य । ह्मणेदीना
तेंउद्धरोन । पावनकरणेंमजअतां ८९ मीअधमअपराधाचीखाणी । मजत्रातानसेचियात्रिभुवनीं । ह्मणोनिठेवी
पदींमूर्ध्नी । दंडकरामजह्मणतसे ९० स्वामीवदतएकमाते । तूंशरणजाईलीलावतीतें । तेक्षमाकरीअपराधातें ।

---

१ दासी २ वैराग्य. ३ लाकडाची बाहुली. ४ पदर. ५ वीज. ६ दोन हात जोडून ७ मुक्त

निश्चयातेंजाणतूं ९१ मगलीलावतीचेंचरणकमळ । धरितीझालीतेवेल्हाळ । पदींठेवूनियांभाळ । ह्मणेअपरा धीमीजननिये ९२ तेमहासाध्वीपतिव्रता । केदानेणेद्वैतवार्ता । ऐसेंनकरींवोपुन्हांआतां । सद्गुरुसमर्थाभजावें ९३ सर्वविनवीबद्धकरीं । उपदेशदेऊनमजउद्धरी । दयासिंधूदयाकरी । दीनावरीयेवेळे ९४ यावरीमत्स्येंद्रव दतीवाणी । गोरक्षयेईलयेस्थानीं । तोउद्धरीलतुह्मालागोनी । मनींनिश्चयअसोंद्या ९५ यावरीप्रार्थीलीलाव ती । हादुर्मतिगेलाअधोगती । यासीद्यावीउत्तमगती । पुनरावृत्तीचुकवावी ९६ ऐकोनह्मणतीमत्स्येंद्रनाथ । जै सेंजयाचेंसंचितँ । तैसीक्रियमाणक्रियाहोत । आपुलेंकेलेंफळपावे ९७ लीलावतीदेतप्रतिवचन । कृतार्थहोत तवदर्शन ।ऐसेंदर्शनमाहिमान । तेंकायअसत्यहोईल ९८ संचितक्रियमाणप्रालब्ध । तुमचेस्मरणेंहोतीदग्ध । स द्गुरुमहिमाअगाध । शेषहीवर्णूनशकेची ९९ नसेगुरुकृपेंकाळवेळ । गुरुकृपेंजिंकूंकाळिकाळ । गुरुकृपेंस्वानं दसोहळे । प्राप्तहोतसेपैं १०० लोहशस्त्रेंकरोन । परिसासींकेलेंजरीताडण । किंवाकेलियाअर्चन । सुवर्णकरणें निजधर्म १ ईश्वरींवैरकिंवाशरण । जेंविंचुकवीजन्ममरण । गजनक्रहोतांदर्शन । स्वयेंप्राप्तहोयदोघां २कीं एकीला विलातस्कर । एकघायघालीनिष्ठुर । परीउभयांसएकसर । छायाअभेदजापरी ३ एकींदीपप्रदीप्तकेला । तया वरीप्रकाशकेला । तस्करांसीअपारझाला । अभेदप्रकाशपैं ४ जेंविंगंगोदकसुवर्णपात्रीं । कींमृन्मयकलशामा झारीं । पवित्रपणेंनिर्धारी । अभेदपैंजाणावें ५ तैसेसज्जनआणिदुर्जन । तुह्माप्रातिसमसमान । आतांयासीं उद्धरोन । करावेंपावनसमर्थ ६ यापरीपरिसोनम्लानोत्तर । हेलावलादयासागर । कृपादृष्टींमत्स्येंद्र । अवलो कितीतयातें ७ जेंविनिद्रिस्थहोयजागृत । तैसाउठताझालात्वरित । भस्मांतूनिअकस्मात । प्रगट होतसत्वर ८ एकचिझालाजयजयकार । समग्रपाहतीनारीनर । रावहोयहर्षनिर्भर । आनंदथो रवर्तला ९ दुर्धरयेऊनपदाब्जीं । षट्पदेंहोऊनघालीरुंजी । ह्मणेधन्यधन्यश्रीनाथजी । उद्धारकेला

१ कधीही. २ नरक. ३ पुनर्जन्म. ४ प्रारब्ध. ५ वृक्ष. ६ चोर. ७ मातीचा. ८ मुक्त. ९ समुद्र. १० भ्रमर.

पैमाझा १० स्वामीचेदर्शनेंकरून । मजजन्मांतरींचेंझालेंज्ञान । अनेककेलेंदुष्टाचरण । दुष्टदेहपावलों ११
वृकं१व्याघ्रसर्पतामस । हेजन्मघेतलेबहुवस । जीवनाशअसमास । हत्याघडल्याबहुतची १२आतांनरदेहातंपावून।
मजनघडलेंकांहींसाधन । मजघडलेंगुरुभक्तछळण । तेणेंदंडपावलों १३ माझेगुणदोषअगणित । चित्रगुप्तझा
लेथकित । ह्मणोनिघेतलेंदेहांत । पुनर्जन्मपावलों १४ आजन्मदोषाचेगिरि२वर । गुरुकृपेचेंहोऊनिवज्र । भग्न
झालेएकसर । अगाधसामर्थ्यजयाचें १५ स्वामीकृपाअवलोकनें । मजकेलेंपुन्हांनिर्माण । मीकायहोऊंउत्तीर्ण ।
जगद्गुरूचेंयेवेळीं १६ मगआरंभिताझालास्तुती । जेंमत्स्येंद्रनाथचक्रवर्ती । जगदोद्धाराचेआर्ती । अवता
रघेमीगुरुवर्या १७ नमूंआदेशदेशरहिता । पूर्णब्रह्मामायातीता । तूंसायुज्यपदाचादाता । गुरुसमर्थादा
तारा १८ नमोकामगजविदारणा । क्रोधअहिनिकंदना । लोभारण्यअग्निदहना । मत्सरछेदनामत्स्येंद्रा १९
मदनदहनमदनांतका । त्रितां३पहरणात्रिपुरांतका । अविद्यानाशकभद्रकारका । चित्सुखदायकाश्रीमूर्ती २०
आतांविनवीस्वामीप्रती । पुन्हांनसाव्याजन्मपंक्ती । जन्ममृत्यूच्याविपत्ती । कितीआतांभोगाव्या २१
कैचाप्रपंचकैचेंघर । मिथ्यामायेचेंवोडंबर४ । विषयासक्तहोऊननर । क्षणिकसुखातेंआतुडती २२ लिंगदेहा
चाकरूनिनाश । अविद्येचातोडवीपाश । जीवदशेचाभेदभास । अविनाशपदींमेळवी २३ यापरीपारिसोन
विनवणी । वदतीमत्स्येंद्रअभयवाणी । उदितझालासीदीक्षाग्रहणीं । तरीअर्पितोंतुजलागीं २४ मगउपदेशि
लानिगममंत्र । मुद्राशृंगीयोगसूत्र । दिव्यदीक्षापवित्र । देतेंझालेसद्गुरू २५ मस्तकींठेवूनिवरदहस्त । नाम
ठेविलेंदुर्धरनाथ । आज्ञापितीकरींतीर्थ । तेथेंभेटतीसिद्धपैं २६ राजाह्मणेउठाउठी । चमत्कारदेखिलादृष्टीं ।
वसिष्ठेंसूर्यरथींछाटी । प्रकाशविलीप्रतापें २७ याज्ञवल्कीचेमंत्राक्षतीं । शुष्ककाष्ठा५पल्लवफुटती । तैसीभस्में ॥४॥
संभूतीं । दिव्यदेहींप्रगटला २८ धन्यधन्यसिद्धप्रताप । दर्शनेजायात्रिविधताप । सद्गदितहोऊननृप ।

---

१ लांडगा. २ पर्वत. ३ आधिदैविक. आधिभौतिक आध्यात्मिक ४ पसारा. ५ सुकलेलें लाकूड.

वेळोवेळांवंदित २९ अद्भुतलीलावतीचाभाव । प्राप्तझालेंनाथवैभव । ब्रह्मांडींकीर्तिगौरव । सार्थककेलेंदेहाचें ३० प्राप्तप्रसादवसन । आणिदुर्धरकरविलापावन । नेणोनसतीचेंमहिमान । छळकेलानकळतां ३१ आतांमीहीकैसातरेन । रोमांचआंगींहोयस्फुरण । प्रेमाश्रुनेत्रींविमळजीवन । कंठदाटेतयाचा ३२ जरीकां तेंसिजावेंशरण । हेंहीलौकिकींविलक्षण । मगसदृढनिश्चयेंकरून । धरीचरणगुरूचे ३३ हृदयझालेंसद्गद पोटीं । मंत्रदिधलाकर्णपुटीं । तुझीसरलीअटाआटी । जन्मराहटीचुकविली ३४ मगप्रार्थीतसेमालती । मत्स्यें द्रतीतेंआज्ञापिती । तुजउद्धरीलीलावती । तीतेंशरणजायतूं ३५ विषमभावनधरीअंतरीं । शुद्धमनेंसेवा करीं । पुत्रहोईलनिर्द्धारीं । पराक्रमीविजयीतो ३६ एकभावेंएकाचचित्तीं । तुह्मीअसावेंअभेदप्रीतीं । ऐसेंसां गूनतयेप्रती । मत्स्येंद्रजातीतेधवां ३७ नृपेंसोडूनराज्यभार । अमात्यकरितीकारभार । मांडलिकदेतीकर भार । प्रजारक्षितीस्वभावें ३८ अतिथिपूजूनझालालाभ । यास्तवकरितांचिआरंभ । चढोवेढींहोतलाभ । याचकांतेंगौरवी ३९ विप्रांदेऊनिअग्रहारें । ठायींठायींअन्नछत्रें । शिवप्रासादविष्णुमंदिरें । तडागमठिका वापिका ४० कोणीयाचकनजायाविन्मुख । देशोदेशींगाजलीहाक । लीलावतीपरमधार्मिक । दिगंतकीर्तिजा हली ४१ असोयापरीस्वधर्माचरण । नाथार्चनआणिसंतर्पण । शुक्लपक्षचंद्रन्यायेंकरून । धर्मवर्धनकरीतसे ४२ प्रत्यहींचालवीसत्काळ । प्राप्तझालाप्रसूतिकाळ । अलभ्याचालाभकाळ । प्राप्तवेळाआलीपैं ४३ नवमास भरतांजाण । पुत्रजन्मलापरमसगुण । परमसुखरूपलावण्य । मीनकेतनदूसरा ४४ गुढियातोरणेंमंगलोत्सव । मंडपउभविलेअतिअपूर्व । याचकांचाअतिगौरव । धनेंवसनेंअर्पिती ४५ जातकर्मनामकरण । ब्रह्मानंदवो ढवलापरम । चंद्रचूडठेविलेंनाम । शर्करावांटिल्यासमस्तीं ४६ लीलावतीपुत्रवंती । पाहूनसंतोषेमालती । अक्षयवाणेंस्त्रियाकरिती । हरिद्राकुंकुमपै ४७ शुद्धपक्षींचाजेंविचंद्र । तैसावाढेराजकुमर । तोंमालतीतेंद्रे

१ उदक, २ येणेंजाणें. ३ प्रधान. ४ कामदेव. ५ वस्त्रें.

 व्यपुत्र । होताझालातेधवां ४८ वाद्येंवाजतीमंगळतुरें । दिव्यमंडपतोरणेमखरें । जातकर्मनामसंस्कार । शर्क 
रागजरेंवांटिती ४९ सुभद्रठेविलेंनामाभिधान । उभयादिसतीज्येष्ठेंसान । अनर्घ्यरत्नेंरत्नभूषण । बाळठेंणी
 लेववीती ५० दोघेदिसतीकिशोर । एकरामकींसौमित्र । कींएकशशीएकमित्र । बालार्कतेउगवले ५१ चिम 
णेवाहनविराजती । सर्वेचिमणेसेवकशोभती । चिमणेसहचरअसती । चिमणींआयुधेंगोजरीं ५२ यापरीकुमा
रसकुमार । कमनीयस्वरूपेंतेकिशोर । उपनयनसंस्कारानंतर । विवाहयोजनायोजिती ५३ इंद्रपुरनामेंन
गर । तेथीलचित्रवीर्यनृपवर । उभयकन्याअतिसुंदर । उपवरहोतीतियाच्या ५४ परमसुंदरलावण्यखाणी ।
त्यांतेंदेखोनिलाजतीपद्मिणी । चातुर्यसौंदर्यत्यांलागोनी । विरंचीनेंनिर्मिलें ५५ रूपवंतीगुणवती । नामेंठे
विलींकन्येप्रती । त्यांवरीरायाचीबहुप्रीती । समीपअसतीसर्वदां ५६ त्यांचेंसौंदर्यआणिसद्गुण । पाहूननृपा
चेंचित्तउद्विग्न । यांसीवरयोग्यअसेकोण । भूमंडळांतदिसेना ५७ अमात्यमंत्रीपुरोहित । भूपाळतयांतेंविचा
रित । यांतेंवरयोजनाकरावीत्वरित । कुळशीळनृपवर्य ५८ मंत्रीह्मणेपाहिलेंसर्व । कोठेंसमसमाननदेखूंउभय ।
परीएकस्थळींअतिअपूर्व । उभयपुत्रअसती ५९ ऋणानुबंधमुख्यकारण । जरींअसेब्रह्मसूत्रप्रमाण । तरीच
साध्यहोतीजाण । प्रयत्नकरूंतयाचा ६० सुदर्शनाचेउभयनंदन । रूपाथिलेप्रतिमदन । सर्वलक्षणींसुलक्षण ।
सगुणगुणीदेखिले ६१ कुळशीळगोत्रघटित । वाग्निश्चयाजातोंतेथ । स्थळयोग्यतेचिदिसत । शरीरसंबंधक
रावया ६२ ऐकोनिसंतोषलानृपवर । ह्मणेवधूयोग्यतेचिवर । पाहोनियांराशिनक्षत्र । तिथिनिश्चयकरावा ६३ पुरो
हितामूळपाचारून । प्रेषितांझालानृपआपण । समारंभेंआणिलेंजाण । सीमंतपूजनींतेवेळां ६४ रावसा
मोराजाऊनत्यांतें । पाहताझालाउभयजामातातें । सुखसमुद्रापातलेंभरतें । वारंवारविलोकी ६५ 
यथाविधीपाणिग्रहण । रायेंवोपिलेंअपारआंदण । गजवाजीरथसुखासन । दासदासीइत्यादी ६६ याचकांतें

१ मोठा व लहान. २ मौंजी नंतर. ३ ब्रह्मदेव. ४प्रधान. ५ दोघे. ६ काम. ७ बोलावणें. ८ पाठविता झाला. ९ हत्ती घोडे.

धनअपार । द्रव्यकोशफोडोनिधनसंभार । देऊनितोषविलेविप्र । कीर्तिप्रसरहोतसे ६७ चारीदिवसलग्नसो हळा । होताझालातेवेळां । उभयजामातांपाहूनडोळां । संतोषनृपालाहोतसे ६८ निरोपमागूनवधुवर । प्रवेशलेआपुलेनगर । मंगळवाद्यतुरेगजर । इंदिरापूजनपैंकेलें ६९ लीलावतीआणिमालती । स्नुषोपाहोनि हर्षतीचित्तीं । रूपवंतीआणिगुणवंती । अतिआवडतीतयांतें ७० नगरनागीरकसर्वजन । ह्मणतीनिर्मिलावि धीन । सौंदर्यरतीमदन । तैसेभासतीआह्मातें ७१ कांहींदिवसलोटल्यावर । होणारनचुकेअणुमात्र । राया चाजोकानिष्ठपुत्र । सुभद्रनामजयाचें ७२ तोजाताझालावनविहारीं । चतुरंगसेनादळभारी । मृगयाखेळतां सहपरिवारीं । सहचरसर्वेसन्निध ७३ तंवदेखिलातडागसुंदर । माजीकमळेंश्वेतशतपत्र । भोंवतेवृक्षमनोहर । परमरहस्यरमणिक ७४ समवयतेवयस्क । रहस्यारहस्यविनोदकौतुक । करितीतेथेंएकमेक । तोंअर्कअस्तापा वला ७५ तेथेंचिराहतीउपवनीं । शिबिरेंउभाविलींतयेस्थानीं । मृगमांसादिपक्वान्नीं । भोजनींबैसलेसर्वही ७६ अन्योन्यअन्नेंझुगारिती । येरयेरांअपशब्दवदती । कोणवारीतयांप्रती । राजपुत्रह्मणोनी ७७ मुख्यप्रभू चाअविचार । मगप्रजेसीकैंचाविचार । आधींचतस्करदुराचार । साह्यनृपवरमगतया ७८ आसोभोजनें झाल्यासमग्र । तांबूलादिउपचार । परिमळसुमनालंकार । ग्रहणकरितीसर्वही ७९ तोंतंववसंतऋतूचादिवस । घर्मेंडौरलेअसमास । स्रक्चंदनग्रहांतसुवास । चर्चियेलेंसर्वांनी ८० तडागविस्तीर्णएकयोजन । निरभ्रचंद्रा चेस्वच्छकिरण । प्रकाशपडेअतिसघन । पूर्णातिथीतेपौर्णिमा ८१ दूतांआज्ञापीराजनंदन । नौका आणावल्वेिरेंहून । सेवकांतेंआज्ञाप्रमाण । द्रोणीआणिलीतयांनीं ८२ आरोहणकरितीनौकेआंत । माजीवारांगनांचेंनृत्यहोत । हडपीकरतांबूलदेत । हर्षयुक्तसर्वही ८३ करितीहास्यगीतविनोद । नाना कौतुकेंगद्यपद्य । जेंविउचंबळेब्रह्मानंद । तेंविसंतोषमानिती ८४ पाहाप्रारब्धगतीविचित्र । जळीं

---

१ सुना. २ तंबू. ३ सुगंधिक वस्तु ४ तलाव. ५ चारकोश.

क्रीडेराजपुत्र । होणारभविष्यस्वतंत्र । भोगिल्याविणनसोडी ८५ नौकाजायआनंदेंकरून । पुढेंओ ढवलेंमहाविघ्न । हानिमृत्युयशलाभजाण । काळपरत्वेंहोतसे ८६ कींदुग्धघटपरिपूर्ण । त्यांतपडेजरी लवेण[1] । कींपीयूषीं[2]विषनिर्माण । होतेंझालेंतेसमयीं ८७ जळामाजीजळदैवत । अप्सरासमवासकरित । परम उग्रतींशोभित । तामसक्रोधेंखवळलीं ८८ तडागसुहृदपरमसखोल । जेविंखळाचेंमानसनकळ । असेतेंजळ अतितुंबळ । अंतनसेतयाचा ८९ अवलेअवलितीतेवेळीं । मध्येंअकस्मातनौकाबुडाली । हाहाःकारेंहाकगा जली । कृतांतवोढवेज्यापरी ९० तडागतटाकींहोतेंकटक[3] । बोभाइलेकरितीशोक । अपारयोढवलेंतयांदुःख । सेवकरुदनकरिताती ९१ कैवर्तकजळींबुडचादेती । परिपारनलगेतयांप्रती । उदकांमध्येंशोधघेती । बहुशि णतीतेवेळा ९२ वार्तावार्तिकजाणविती । वर्तलावृत्तांतनिवेदिती । लीलावतीआणिमालती । सत्वरयेतीते स्थळीं ९३ धबधबाबडवितीवक्षस्थळ । भूमीआहाटितीसभळमौळ । भडभडांवाहेरक्ततुंबळ । जळसंगमहोत से ९४ उभ्याधाईउभयतां । रुदनकरितीलावण्यसरिता । ह्मणतीकोणधांवियेअकांता । नसेत्राताआह्मातें ९५ माझियाकुमारासकुमारा । कोठेंगेलासीसहचरविहारा । सत्वरयेईमाघारा । मार्गतुझापाहतसें ९६ अहाबाळा माझियासगुणा । टाकोनिगेलासीकवणकारणा । स्तनींदाटलामाझियापान्हा । कवणापाजूंयेकाळीं ९७ माझि यातान्हयाराजसा । सकुमाराप्रियपाडसा । जेंविंहरणीपडेफांसा । दाहीदिशाविलोकी ९८ माझान्हे हाळबाळमराळ । उडोनगेलाकोठेंनकळ । मजमृगीचेंपाडसचुकलें । कोठेंपाहूंतयातें ९९ म्यांलीलावतीचें केलेंछळण । ह्मणोनगेलेंमाझेंनिधान । कींमत्स्येंद्रद्रोहघडलाह्मणून । निधानपडिलेंजळीं २०० कींजन्मांतरी चेंदुराचरण । उभेंठाकलेंदुष्टप्राक्तन । ह्मणोनउदेलेंमहाविघ्न । निर्वाणसमयपातला १ पंक्तिभेदकिं वाहरिहरभेद । यास्तवपुत्रशोकदुःखअगाध । कींरिक्तगेलेयाचक्रवृंद[4] । महतखेदयास्तव २ किंवाकरितांशि

---

१ मीठ. २ अमृत. ३ सैन्य. ४ समुदाय.

वपूजन । मध्येंचत्यागिलेंउन्मत्तपणें । कींसाधूंचेंकेलेंछळग । ह्मगोनदुःखदुर्घटहें ३ याजळींहरपलेंमुक्ताफळ दुर्दैवहेंदुष्टदुर्दवखळ । येणेंहरिलामाझाबाळ । तडागजळकाळहें ४ कोणीनामठेविलेंजीवनं । जीवाचिघेतेंजीव प्राण । ऐकोनपक्षीकरितीरुदन । करुणावचनपरिसोनी ५ पुष्पावतीचासुवास । उडोनगेलानभास । निर्मा ल्यहोऊनिउदास । इतेंआतांकायकरूं ६ हीलावण्यसरोवरमराळिका । सद्गुणवल्लीचीसुवेलिका । पाहतांहि च्यावदनेंशशांका । ग्रहणींग्रस्तकाळिमा ७ लीलावतीह्मणेमाय । शोककरिसीव्यर्थकाय । यासीकरींकांहींउपा य । महत्कार्यहोयजें ८ जेणेंअर्पिलातोपीतांबर । जेणेंजीवविलातोदुर्धर । त्याचेपदींधरीनिर्धार । तोकायएक नकरीची ९ दुःखदुस्तरहाभवसमुद्र । त्यांतत्रातासद्गुरुमत्स्येंद्र । अभद्राचेंकरणारभद्र । श्रीगुरुमहाप्रतापी १० यावरीविदेसुदर्शन । सद्गुरुपदींअसावेंमन । विचारेंकरावेंसमाधान । व्यर्थतळमळकासया ११ आपणयो जावाउपाय । तेथेंप्रारब्धकरीअपाय । ईश्वरइच्छेनेंहोयजाय । खेदकायकरोनियां १२ कायहोईलतेंपाहावें भगवच्चिंतनींसर्वदाअसावें । नित्यानित्यविचारावें । मनलावावेंगुरुपदीं १३ अर्थजिज्ञासुअर्थाअर्थी । तेविंसु दर्शनदर्शनार्थी । वैराग्ययुक्तेंविरक्ती । तादात्म्यवृत्तीमत्स्येंद्रीं १४ भृंगकीटकन्यायापरी । अभ्यासंसदादिवा रात्री । चातकन्यायमार्गनेत्रीं । रुद्गुरूचालक्षिती १५ यावरीचंद्रचूडआणिप्रधान । करितेझालेशांतवन । ह्मणतीकरा:व्रताचरण । तेणेंलाभेसर्वही १६ सुदर्शनउभयकामिनी । राहतींझालींतयेस्थानीं । तेथें शिवालयस्थापोनी । प्रशस्तप्रकारप्रासादी १७ शिवद्वारींमंगळतुरें । चतुर्दशविष्णुमंदिरें । दिव्यउभ विलींदामोदरें । अन्नछत्रेंपैंतेथें १८ अतिथिनजायविमुख । देशोदेशींगाजलीहाक । हाटबाजारवे व्हारिक । घडामोडवस्तूंची १९ लीलावतीह्मणेमालती । मत्स्येंद्रवृत्तींधरीप्रीती । ऐकएकाग्रकथानिगुती । तुजप्रतिसांगते २० गुरुवारींकरींनिरशन । अरुणोदयींकरीस्नान । तडागनदीतीरींजाऊन । पूजनकरी

१ मुख चंद्र. २ विघ्न. ३ विषय त्याग.

सद्भावें २१ कुंकुमपद्मपत्रीं । सुरेखमूर्तिरेखावीसाजिरी । तीअर्चोनिषोडशोपचारीं । दिनामौनअसावें २२ उभयपादुकाप्रथमदिवसीं । पदद्वयतेंउत्तरोत्तरेसीं । चंद्रवृद्धिन्यायेसीं । पदद्वयवाढवी २३ रात्रींकरावाजागर । कीर्तनश्रवणभजनगजर । निशीसरल्यानंतर । उत्तरपूजाकरावी २४ यथाविधीसंपादींव्रत । येणेंसिद्धिहोयत्वरित । उपदेशोनिमूळमंत्रातें । येणेंकृतार्थहोसीतूं २५ यापरिअनुष्ठान । हेंइष्टश्रेष्ठआराधन । नष्टकष्टअरिष्टविघ्न । उत्कृष्टसाधनहेंअसे २६ आणीकदीधलेंनवनाथयंत्र । पूजाविधिनिवेदीसमग्र । अनुष्ठानींयोजिलेविप्रें । जपाभिषेककरितीते २७ इकडेकायझालावृत्तांत । सुभद्रबुडालाजळांत । अप्सरापाहोनियातें । कामातुरंजाहल्या २८ राजपुत्रसुलक्षण । पाहूनवेधल्यापंचबाणें । मंदिरींआणितीप्रीतींकरून । तयालागींतिधवां २९ सुवर्णमंदिरेंरत्नखाचित । सुप्रभप्रकाशलखलाखित । तेथेंआणिलाराजसुत । दिव्यभोगअर्पिती ३० तयातेंनेवोनिएकांतीं । नेत्रकटाक्षेंखुणाविती । तयाविकारनयेचित्तीं । कालत्रयींजाणिजे ३१ ह्मणेतुह्मीदेवमीमानव । कैसाकरूंअन्याय । तुह्मीमातामीतनय । सहसाकर्मघडेना ३२ धन्यधन्यतेचिपुरुष । लावण्ययोपितास्वसंतोपें । शरणआलियाधरितांत्रास । तोचिगुरुपुत्रनिश्चय ३३ तयातेंवदती अप्सरावचन । कायावाचाआणिमन । आह्मीतूंतेंवश्यहोऊन । आह्मात्यागिसीशतमूर्खा ३४ सर्वांसमारिलें तत्काळ । तुजरक्षिलेंहेंकायफळ । मगह्मणतीटांकागेबंदिशाळे । करागृहींतयातें ३५ असोयापरीएकसंवत्सर । इकडेवर्तातनपडेअंतर । दिवसदिवसअधिकोत्तर । परमप्रीतींआचरती ३६ जेंविंसरल्यानष्टकाळ । अभ्युदयाचियेवेळ । तेविंप्रगटलेदीनदयाळ । मत्स्येंद्रनाथतेसमयीं ३७ त्यापरमानंदाकायदृष्टांत । जेविंमरतयाप्राप्तअमृत । कींतृपार्थियागंगायेत । अकस्मातवांचपें ३८ लीलावतीमालतीसुदर्शन । सर्वांसझालेंगुरुदर्शन । साष्टांगघालितीलोटांगण । परमप्रीतिकरूनी ३९ प्रार्थितीझालीलीलावती । सद्गुरुपावलेयाआकांतीं । कृत



---

१ रात्र. २ ब्राह्मण. ३ कामव्याप्त. ४ बायका, ५ बंदीत.

सुकृतउदयायेती । तेचीप्राप्तीगुरूची ४० मगमस्तकठेवूनिनाथचरणीं । विनवितीझालीमधुरवचनीं । पुत्रबुडालाजीवेनीं । वरदपुत्रस्वामीचा ४१ नाथपाहातोविचारोन । कोठेंआहेराजनंदन । भूतभविष्यवर्तमान । अंतरसाक्षीजाणती ४२ तेव्हांउदकींफुंकितांविभूत । देवताझालयाभयाभीत । तत्काळआणिलाराजसुत । अमोल्यभूषणेंअर्पोनी ४३ जेंवियमुनाऱ्हदांतून । निघताझालासीमंतिनीरमण । कींक्षीराब्धींतूनिरोहिणीरमण । निष्कळंकनिघतसे ४४ तैसाचिसुभद्राराजपुत्र । निघताझालाक्षणमात्र । आनंदींनिमग्नसर्वत्र । हर्षापात्रनसेची ४५ सुभद्रेंपाहूनिउठाउठी । मत्स्येंद्रचरणींघातलीमिठी । हर्षवोसंडोनिपोटीं । प्रेमाश्रुनेत्रींलोटले ४६ जननीजनकाचेधरूनिचरण । परस्परेंदेतीआलिंगन । विमलाश्रूसजलनयन । होतेझालेअन्योन्यही ४७ जेंविकौसल्येभेटेरघुवीर । तैसामातेसभेटेसुभद्र । अखंडवाद्यांचागजर । मंगळतुरेंवाजती ४८ शर्करावांटितीगजस्कंधी । याचकांचीमिळालीमांदी । अर्पितेझालेद्रव्यसमृद्धी । द्विजांधेनूअर्पिल्या ४९ सुदर्शनआणिद्वयकामिनी । जातींझालींआनंदवनीं । पुढेंबदरिकाश्रमलक्षोनी । स्वर्गारोहणींजातसे १५० अदृश्यझालेनाथमत्स्येंद्र । इकडेचंद्रचूडआणिसुभद्र । सवेंघेऊनदळभार । स्वनगरांतेंपातले ५१ पुढेंकथागोडबहुत । अमृतातेंपैजजिंकित । पीयूषसारोनिपरौत । स्वरुचातेंचोजवी ५२ नवमोध्यायपरमपावन । नवविधभक्तीचेंमुख्यस्थान । कींहेंनवविधकोशधन । नवनीतहोययेग्रंथी ५३ हेंनवनाथांचेंनिवासभुवन । हेंनवग्रहांचेंएकादशस्थान । हाअध्यायकरितांश्रवण । ग्रहबाधानबाधी ५४ कींहींनवखंडेंसुंदर । यातनवद्वारांचेंमंदिर । कींनवरत्नाचादिव्यहार । संतश्रोतियांअर्पिला ५५ हाअध्यायऐकतांएकाग्र । विदेशींवंधूभेटतीकुमर । गतवस्तुलाभसत्वर । श्रवणमात्रेंकरूनी ५६ सौभाग्यासीसौभाग्यवर्द्धन । दरिद्रीहोतीधनसंपन्न । विगतधवाहोतीपावन । जन्मांतरींपतिलाभे ५७ रोगगंडांतरकाळमरण । श्रवणपठणेंजायनिरसोन । कदा

---

१ उदकांत. २ चंद्र. ३ आई व बाप. ४ दोघी बायका. ५ अमृत. ६ लोणी.

अन्यथानव्हेजाण । प्रत्यक्षप्रमाणकासया ५८ भावविश्वासेंनिश्चयेंकरून । हेंफळप्राप्तीसीमुख्यकारण । सर्वांसि द्वावप्राप्तयेणें । सत्यसत्यात्रिवाचा ॥ ५९ ॥ ॥ श्रीमत्सद्गुरोर्जयंती । आदिनाथलीलामृती । सुरसश्रोते सुरसपानकरिती । स्वादजाणतीचतुरस्र ॥ २६० ॥ ॥ स्वस्तिश्रीमंगलायतन । भैरवपर्दीनिवासस्थान । आदिनाथविनयसंपन्न । नवमोध्यायींनमीतसे ॥ २६१ ॥ ॥ इतिनवमोध्यायः ॥ ९ ॥ श्रीमत्आदिनाथार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ छ ॥ ॥ ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ ॥





अध्याय १० वा ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीनमोआदिनाथपुरातना । निराकारासनातना । पूर्णब्रह्मानिरंजना । नामरूपातीतनूं १ जेंज्योतिर्मयपरंज्योती । जेथश्रुतिस्मृतिपारनेणती । पुराणेंस्वरूपींभांबावती । तेथेंगतिनपवेची २ नपवेचतुराननं । व्यासझालावक्रवदन । सहस्रशीर्षेंहीलपोन । पाताळविवरींराहिला ३ समग्रअद्रिचूर्णकज्जल । समुद्रशाईसमृद्धिजल । सुरद्रुमशाखालेखणीसबळ । पत्रविशाळकुंभिनी ४ लेखकस्वयेंसरस्वती । वक्तावाचस्पती । तरींतवगुणमहिमानपावती । तेथेंमीकितीमतिमंद ५ यालागींकरितीअनुष्ठान । मौनस्थ आणिधूम्रपान । ऊर्ध्वबाहूपर्णाशन । अनेकसाधनेंसाधिती ६ तरींनपवतीमोक्षद्वार । भ्रांतिभ्रमेंपडेअंधार । ॥४८॥

१ ब्रह्मदेव. २ शेष. ३ पर्वत. ४ कल्पवृक्ष. ५ पृथ्वी. ६ बृहस्पति.

चांचपितीएकसंवत्सर । अणुमात्रमार्गदिसेना ७ जेंविआदर्शीनिकेतन । त्यांतगुंतोनिराहेश्वान । नसांपडेत्या द्वारखूण । चरफडोनशिणतसे ८ जेविंजन्मांधवृंदमतें । द्विरदह्मणतीअवयवातें । देखणासर्वांगदेखत । सालं कारीहागज ९ कींचाहुलीचेंश्वान । भुंकेतस्करादेखून । इतरभुंकतीत्यावरोन । अट्टहास्यत्राणतेवेळे १० तामसराजसक्रियाकरिती । अनेकयज्ञयागआचरती । परीगुरुमार्गातेंनेणती । कैसीमुक्तीतर्यापैं ११ वृत्तांत उत्तमोत्तमवदती । उत्कर्षमाहात्म्यह्मणतीतीर्थी । अनेकउपास्यउपासनाकरिती । तरीस्वात्मस्थितीनबाणे १२ गाणपत्यह्मणतीगणपती । शाक्तकल्पितीमहाशक्ती । स्मार्तह्मणतीपशुपती । वैष्णवह्मणतीमहाविष्णु १३ वर्ततेंतपैंयज्ञहवन । यंत्रमंत्रादिपुरश्चरण । एकविधनराहेमन । येणेंशीणसर्वही १४ श्रावणसंपत्तिशनिवारीं । नरहरीपूजितीभिंतीवरी । भानुदिवसातेंतमारी । अर्चितातीआदरें १५ इंदुवासरींत्रिपुरारी । पूजनकरिती निशिमाझारी । भौमवारीमंगळागौरी । पूजितातीआवडीं १६ शशिपुत्रबृहस्पतीअर्चितीचित्रें । भृगुवारीं जीवत्यास्वतंत्र । संवत्सरींव्रतसमग्र । कितीह्मणोनिसांगावीं १७ तयांचेंएकविधनसेमन । चपळत्वेंकरीतसे गमन । जेविंवारांगनेचेंशय्येगमन । पतिनाहींरोकटी १८ एकसिद्धिसाधनींगुंतले । तेगुरुपदातेंमुकले । तेआत्मस्थितीदुरावले । मार्गचुकलेसर्वस्वें १९ गतकथासंबंधविस्तार । जीवविलेसुभद्रदुर्धर । आतांपरिसावें एकाग्र । सिंहावलोकनेंकरूनी २० ब्रह्मांडसमाधीचेआर्ते । गोरक्षगेलेयोगपंथे । बहुतदिवसलागलेत्यांतें । मार्गपाहातीसद्गुरू २१ मत्स्येंद्रगिरीतेमत्स्येंद्र । ध्यानस्थपाहतीतेथेंकुमर । पिंडींशोधिलेसमग्र । ब्रह्मांडाते पहाती २२ तोंसहस्रदळींसामावोन । जीवशिवहोऊनलीन । मत्स्येंद्रेंआणिलेतेथून । निजपुत्रातेंतेवेळी २३ गोरक्षमिठीघालोनपायीं । मत्स्येंद्रेंकवळिलेंदोहींबाहीं । तोब्रह्मानंदतयेसमयीं । पारनाहींत्यासुखा २४ जेंविंक चसंजीवनीसंपन्न । गुरूतेंभेटेप्रीतीकरून । संतोषपावलेविबुधजन । तेंविंआनंदवर्तला २५ कींसीताशुद्धीचेआ

१ रविवारी. २ सूर्य. ३ बुध. ४ वेश्या. ५ सतीजागे.

॥०ली तीं । मारुतीगेलेलंकेप्रती । येताझालापुनरावृत्ती । रघुपतीतेंभेटला २६ कींविदेशींगेलानंदन । मातेसींभेटे अ०
द्रव्यसंपन्न । तेविंसंतोषअन्योन्य । होताझालाउभयांतें २७ मत्स्येंद्रवदतीगोरक्षातें । मीजातसेंपुष्पकरातें ।
॥३॥ तुवांयावेंसवेगतेथें । सिद्धमेळाहोतसे २८ तोपरमपावनगिरिवर । अद्यापीजाणतीसर्वत्र । तयासमीपसागर । ॥१०॥
मत्स्येंद्रगडह्मणती २९ तेथूनिनिघालेसत्वर । तोंप्राप्तझालेंश्रियाळपुर । तेथेंयेवोनिमत्स्येंद्रपुत्र । नगरप्रदे
शींउतरले ३० तोंशुक्लपक्षश्रावणमास । नागपंचमीपुण्यदिवस । घरोघरींआनंदबहुवस । मंगलोत्साहहोतसे
३१ तोंप्राप्तझालामाध्यान्हसमय । भिक्षेसिजातीमत्स्येंद्रतनय । एकदुर्बळाद्विजवर्य । दारिद्रदैन्येंव्यापिला ३२
शिलोंछवृत्तीकरोन । शुक्लवृत्तीनेंतोब्राह्मण । करीकुटुंबउदरभरण । पोषणकरीस्वदुःखें ३३ तेथेंयेऊनगोरक्ष
नाथ । अलक्षशब्दकरितीनाथ । विप्रभार्यातयावदत । विलंबआहेक्षणभरी ३४ आजअसेनागपूजन । मृति
केचाशेषकरून । षोडशोपचारेंअर्चन । नंतरभोजनकरावें ३५ येणेंतुष्टिपुष्टिआयुष्यवर्द्धन । अप्राप्तलक्ष्मी
प्राप्तपूर्ण । पुत्रपौत्रवर्द्धमान । होतअसेयाव्रतें ३६ गोरक्षह्मणेप्रतिवर्षीं । अनुष्ठीतसायाव्रतासी । तरीदैन्य
दशाकिमर्थऐसी । अन्नआच्छादननसेची ३७ मृतिकापूजूनपुरतेआर्त । तरीकांनपूजितीपर्वत । भ्रमेंभुलले
जनसर्वत्र । परमार्थातेंनेणती ३८ मृत्तिकाशेषाकृतीपूजिती । तरींप्रत्यक्षकांनपाचारिती । येरीवदेतयाप्रती ।
अघटितकेंविघडेहे ३९ नाथकरीशृंगीवादन । असंख्यप्रगटलेकद्रुनंदन । श्वेतपीतआणिकृष्ण । मणिमस्त
कींशोभती ४० प्रवाळवर्णीमाणिक्यवर्णी । सुवर्णवर्णीरजतवर्णी । अरुणवर्णीशुक्लवर्णी । नीलवर्णीअसंख्य ४१
एकफणीपंचफणी । दशफणीशतफणी । निघतेझालेतेक्षणीं । चक्षुश्रवेअनेक ४२ अगोचरगोचरदर्वीकर ।
बहुविधदेखूनभयातुर । होतेझालेनारीनर । तवविप्रभर्याप्रार्थित ४३ ह्मणेस्वामीपादोदर । उत्पन्नझालेहे ॥११॥
अपार । परमभयानकाविखार । यांचेंभयवाटतें ४४ आश्वासीतसद्गुरुनाथ । पूजनकराप्रत्यक्षांतें । शेषभावीमृ

१ शेत कापल्यावर तेथें पडलेली कणसे वेंचणें तें (शिल) व मार्गावरचें धान्य वेंचणें तें उंच्छ मिळून शिलोंछवृत्ति हें नाव.

तिर्केत । पूजीतहोतांआवडी ४५ प्रत्यक्षप्रचितीतुह्मांप्रती । दैवेंदेवतासिद्धहोती । याचेंअर्चनपरमप्रीतीं । देव
गौरवकरावा ४६ यांजपासूनतुह्मासभय । नाहींसर्वथामाझेंअभय । हेशिवभूषणपरमसदय । तुष्टहोतीसर्वांतें
४७ नगरजनपाहूंपातले । प्रभूससांगतीनवलवर्तलें । पाताळसर्पभूमीसआले । आश्चर्यपाहिलेंआजिहें ४८
व्याळवृंदसंभार । प्रगटझालेएकसर । नकळेईश्वराचेंचरित्र । अद्भुतप्रतापनाथाचा ४९ एकोनतृपधांवेसत्वर।
करीगोरक्षानमस्कार । स्तवनकरितसेअपार । सद्गुरूचेंयेवेळीं ५० जयजयदीनदयाळपतितोद्धारणा । भक्त
वत्सलकरुणाघना । मजउद्धरीआलोंशरणा । व्रीदाभिमानअसावा ५१ नाथआज्ञापितीनयेसमयीं । पन्नगन्या
वेंआपुल्यागृहीं । अर्चोनियांलवलाहीं । अरण्यांतसोडावे५२ऐसीआज्ञासर्वांप्रती । अवश्यह्मणेतेव्हांनृपती ।
ह्मणतीवाटेयाचीभीती । मगविभूतीकुंकितां५३तेव्हांनिर्भयझालेसर्वत्र । नागनेतीनारीनर।पूजितीतयांषोडशो
पचार । क्षीरनैवेद्यअर्पिती ५४ यापरीपंचमीपूजन । करितेझालेनगरजन । पूर्वस्थानींगोरक्षयेऊन । वास
करितीसंतोषें ५५ काद्रवेयसमारंभसंयुक्त । पौरवनृपवर्यासहित । येतेझालेसद्गुरूजेथें । नगराबाहेरतेवेळां५६
शिबिकायानींनागकुळ । वाद्यगजरेंआणिलेव्याळ । तयेस्थानीसोडिलेसकळ । सद्गुरूसंनिधतेसमयीं ५७ सद्गु
रुआज्ञापीतयां । तुह्मीजावेंआपुल्याठायां । प्रतिवर्षीयेऊनियां । प्रगटव्हावेंयेस्थळीं ५८ गोरक्षआज्ञाहोतां
सवेग । गुप्तझालेतेव्हांनाग । अद्यापीवरीपाहातीजग । अझूनआज्ञारक्षिती ५९ नृपवंदेसर्वज्ञमूर्ती ।
शरणपातलोसद्गुरूप्रती । जगदोद्धाराचेआर्ती । स्वामीएथेंपातले ६० मीअपराधीसर्वांपरी । आतांमज
पतितातेंउद्धरीं । भवाब्धींउतरोनियेअवसरीं । तारीमजदयाळा ६१ यापरीपरिसोनविनीतवचन ।
सकृपझालेदयाघन । निगममंत्रउपदेशून । पावनकेलेंतेसमयीं ६२ नामयाचेंसोमदत्त । मगठेविलें
सोमनाथ । दीक्षादेऊनियांत्वरित । अलक्षउच्चारकरीतसे ६३ जेंअलक्षलक्षातीत । तेपिंडब्रह्मांडीप्रो

१ सर्प. २ सत्वर. ३ पालखी. ४ संसाररूपी समुद्र. ५ नम्रतेचें भाषण.

त । ध्येयध्यातेंपणहिसरत । सच्चित्सस्वरूपस्वयेंच ६४ तेथेंविश्वचिझालेदेव । तेथेंद्वैताचानसेठाव । स्व संवेद्यस्वयमेव । सबाह्यहोयआपण ६५ तयाआज्ञाकरितीशीघ्र । तीर्थेंकरावींसमग्र । स्वरूपींलक्षअव्यग्र । निरंतरअसावें ६६ असोद्वीपांतरींचेबीज । चिंचिणीचेंहोतेंजहज । तेथेंराखितीयोगिराज । वृक्षविस्तारजा हाला ६७ स्थूळफळेंस्थूळतरुवर । अद्यापिपाहतीजनसर्व । तेथेंवासनिरंतर । गोरक्षाचाअजेंपैं ६८ अद्यापि सेवासूत्रतेथ । आर्तसिद्धीसत्वरहोत । तेथेंस्फुरदस्वामीसमर्थ । प्रत्यक्षदर्शनहोताती ६९ पुत्रार्थियांसिदे तीपुत्र । नेत्रार्थियांसीयेतीनेत्र । ऐश्वर्यआणिपरत्र । परमार्थप्राप्ततयातें ७० ब्रह्मराक्षसब्रह्मदोष । दर्श नमात्रेंहोयनिर्दोष । तेथेंवासकरितांनिर्दोष । ज्ञानहोयअनेक्षपैं ७१ अद्यापितेंजागृतस्थान । असोगोरक्ष करितीतेथूनिगमन । जातांदेखिलेंअरण्यवन । परमघोरभयानक ७२ तोंतेथेंवर्तलेंअपूर्वजाण । समिधार्थ पातलाऋषिनंदन । सवेंभार्याअपूर्वलावण्य । येतिझालीसंनिध ७३ एकांतपाहूनकानन । प्रियप्रियातेंअ नन्य । परमप्रीतींप्रियभाषण । विनोदकरितीपरस्परें ७४ वयस्कअसतांऋषिनंदन । सौंदर्यकामिनीनवयौव न । ह्मणेआहेएकांतवन । क्रीडास्थानसुंदर ७५ निबिडछायावृक्षसघन । तेथेंप्रवेशेनासूर्यकिरण । करूंआतांकु शलशयन । परमविव्हळहोतसे ७६ तोंवदेनकरीऐसें । दिवामैथुनवर्जअसे । रविआलामाध्यान्हास । अनुचित केवींकरावें ७७ कामेंविव्हळविकळकामिनी । तीनेंवदेहोचातुर्यखाणी । कंठींझोंबलीतृपासर्पिणी । ईतेंशांतवी सत्वर ७८ रसनेशोषसंतप्तगात्रें । पत्रद्रोणविशाळपात्रें । ह्मणेआणितोंयेक्षगमात्रें । अविलंबेंसींयेकाळीं ७९ प त्रद्रोणघेऊनवेगीं । जातीझालीतन्वंगी । जळशोधानार्थएकटीमार्गी । गमनकरीचपळत्वें ८० भविष्यभावीजेसंचि तीं । होणारनचुकेकल्पांतीं । जळानिमितजाययुवती । इकडेकायवर्तलें ८१ तेथेंव्याघ्रपातलाअकस्मात । कृतांत समयवोढवेमृत्य । देखोनिझालाभयाभीत । द्विजपुत्रतेधवां ८२ विक्राळभयानकगाजवीहाक । पुढेंयेतसेतोसन्मु

---

१ अन्यदेशचे. २ चिंचेचे. ३ पुत्र. ४ स्त्री. ५ ब्राह्मण.

८३ मस्तककडकडांचाऊनदशनी । तडतडाटेंअस्थिध्वनी । भडभडांरुधिरतेक्षणीं । भळभळाटेंवाहातसे ८४
खंडविखंडगात्रेंविघडलीं । व्याघ्रगेलातयेकाळीं । जीवनघेऊनजंवपातली । तंवअनर्थरोकडादेखिला ८५
धवधवांहाणीवक्षस्थळ । भूमीसत्राहाटितीझालीमोळ । परमवोढवेप्रळयकाळ । धुळीमस्तकींघालित ८६
अहाप्राक्तनकैसेंगहन । माझेंहरपलेंवनींनिधान । भग्राननादेतचुंबन । अंदोळणदेतसे ८७ प्रळयवातेंजेंविंक
र्दळी । उलथोनपडेभूमंडळीं । वारंवारवदनींधुळी । घालीतसेसदुःखें ८८ उडोनिगेलामाझाहंस । दाहीदिशा
दिसतीवोस । मजएकटीलाअरण्यवास । केंविंकेलासेवल्लभा ८९ दुःखाग्नीच्याझडकतीज्वाळा । नसोसवेयावि
रहानळा । कायकरूंयाकपाळा । ह्मणोनित्राहटीसरोषें ९० विरहदुःसहसहननहोय । वनींएकटीकरूंकाय ।
जगन्निवासाकरिसीकाय । ह्मणोनिबोभायअट्टहास्यें ९१ चक्रवाकवियोगापरी । त्यातेंनिशामजव्याघ्रवैरी ।
कोठेंगेलादुराचारी । माझेवेळेनेणवे ९२ विगतविधवावैधव्यपणें । जेविंस्मशानींभग्नभाजनें । तेंविनिरर्थकझा
लेंजिणें । कायवदनदावावें ९३ जळोजळोहेंजीवित । सजीवअसोनिमिरवेप्रेत । स्त्रियांचेमाथाहाअनर्थ । धन्य
धन्यरेविधात्या ९४ विलापकरोनिपडेधरणीं । तेथेंकोणसांवरीतिजलागुनी । जिव्हावाळलीनमिळेपाणी ।
दुरळवनींतिएकटी ९५ नेणोजन्मांतरींचेदोष । यास्तवउगवलादुष्टदिवस । कांशिवपूजेचाविध्वंस । केलाअसे
लपूर्वीम्यां ९६ कींव्रतभंगिलेंसाचार । ह्मणूनिहेंप्राप्तदुःखदुस्तर । कींविघडविलेस्त्रीभ्रतार । कींसिद्धपुरुषानिं
दिलें ९७ असोएकटीहरणीपडेफांसा । नैराश्यविलोकीऊर्ध्वदिशा । धांवपावगाजगन्निवासा । माझीदुर्दशायो
जिली ९८ ह्मणेंईश्वरतोसर्वांघटीं । कायकरूनिपडेलदृष्टी । भविष्यलेखजोअदृष्टीं । तोकदापीचुकेना ९९
देवप्रार्थितांदेवधांवती । मजदुर्दैवातेंहीनपवती । ऐसेंह्मणतांशीघ्रगती । गोरक्षतेथंपातले १०० जोपरब्रह्मीचें
आगर । जोदयेचासदयसागर । तोलीलाविग्रहीअवतार । जगदोद्धाराप्रगटला १ पुसतेझालेतिजप्रती ।

---

१ चक्रवाक नामे पक्षी. २ कोणत्या कारणास्तव.

तूंकोणकोठीलकोणाचीयुवती । दुरळवनींएकटीएकांतीं । रुदनकरिसीकिमर्थ २ यावरीवदतीप्रत्युत्तर । कांत कांतोरीमारिलाऽपार्थें । खंडविखंडपडिलेंशरीर । दुःखदुस्तरवोढवलें ३ ह्मणतीजननींऐकवचन । व्यर्थकास याकारिसीरुदन । पूर्वींचापिताबंधुनंदन । भ्रतारकोठेंपूर्वींचा ४ आलीसचौऱ्याशिलक्षफिरोन । त्याचेंतुजका यअसेस्मरण । कोणकोणतेआप्तस्वजन । त्यांचीवोळखतुजकैंची ५ मुळींचनाममृत्युलोक । येथेंमूर्खपणेंक रिसीशोक । मित्रपुत्रजननीजनक । कित्येकमृत्युपावले ६ मृत्युलोकींमरावें । अमरलोकींअमरव्हावें । हेंतू जाणसीआघवें । जेथीलधर्मतेथींचा ७ फेरेफिरसीअनेकयोनीं । जेंविंफिरेअखंडस्मरणी । सर्वत्रठायींपिताज ननी । शोककरणेंकोणाचा ८ एककर्मभूमीसघडजनन । पांचभौतिकदेहनिर्माण । जीवितपाहातांविद्युत्स्फु रण । देहाभिमाननाडले ९ आत्मानित्यओतप्रोत । तोअनित्याचानसेआप्त । तोपाहतांसर्वातीत । अलि प्तपणेंअसेकीं १० कोठोनिआलाकोठेंगेला । आणितोकोठेंसामावला । याचाशोधकायतुजला । कळलासेंसां गमज ११ आत्मानसेस्त्रीनाभ्रतार । शरीरसंबंधमानिसीजर । तरींपुढेंपडलेंकलेवर । शोककायकरिसीतूं १२ आणिकपक्षीयेतीआमणीं । उडोनजातीतेचक्षणीं । पांथस्थवृक्षछायेंयेवोनी । उठोनिजाततेवेळीं १३ गंगा प्रवाहींकाष्टेंमिळती । वेगवेगळीविघडतीमागुती । जळींबुद्बुदहोतीजाती । तोयशाश्वतअखंड १४ विहंगबैसती तरुवरी । सवेंचिउडोनिजातीदुरी । अनेकवृक्षामाझारीं । जावोनियांबैसती १५ प्रपंचवृक्षींजीवशिव । पक्षी बैसलेअभिनव । साक्षीशिवस्वयमेव । विषयफळेंजीवभक्षी १६ विषयफळेंजेभक्षिती । तेआपणाविसरती । तयानसुटेजन्मपंक्ती । दुःखपावतीदुस्तर १७ जन्मांतरींचेंजरींपुण्यहोय । तरींसद्गुरूतेंशरणजाय । तेणेंचु कतीहेअपाय । समरसहोतीस्वस्वरूपीं १८ यापरीविप्रस्त्रीबोधून । तीतेंवदतीआज्ञावचन । प्रेतसार्थककरीजा ऊन । अग्नीइंधनमेळवी १९ तनुपडलीछिन्नभिन्न । गोळाकरीएकवटून । स्वबस्त्रींदृढबांधून । जळानिकटनेवेगीं



१ अरण्यात. २ पंच महाभूतें. ३ विघ्ने. ४ काष्टे ५ शरीर.

१२० अस्थीपतीच्याकरींगोळा । वस्त्रींबांधीतयेवेळा । ग्रंथीमस्तकींघेत अंबेला । शोककरीआक्रोशें २१ स्वामीह्म णतीतिजकारणं । तूंपुढेंजाईमीआणितोंइंधनें । तरूतेंहस्तस्पर्शितांजाण । जातीउद्धरोनतेकाळीं २२ धन्यधन्य तेचिवृक्ष । जयातेंस्पर्शकरीगोरक्ष । काष्ठेंमोडितीकंजाक्ष । सर्वाध्यक्ष जगद्गुरू २३ काष्ठभाररचूनिशीघ्र।पाचारिला हिंसकव्याघ्र । जेणेंभक्षिलाविप्रपुत्र । वोपीतयापृष्ठींतींकाष्ठें २४ इतरशुष्ककाष्टसंभार । अंतरिक्षजाती अपार । पा हूनतेंशुद्धकांतार । तयातटींठेविला १२५ द्विजभार्येंवदतीउत्तर । हातुझाआणिलातस्कर । तीतेंवाटेच मत्कार । त रीभयवाटेअंतरीं २६ ह्मणेहाप्रत्यक्षईश्वर । धरूनिआणिलासजीवव्याघ्र । आणिकाष्ठभारपर्वताकार । अधरतिष्ठ तीज्यासत्यें २७ अगाधईश्वरीसूत्र । जळावरीपृथ्वीअंबर । स्तंभावीणउभविलेंअंबर । अघटितचरित्रजयाचें २८ पंचतत्वांचेंअसेवैर । परीएकहोतीपरस्पर । अपरोक्षशशिभास्कर । नक्षत्रादिअसती २९ असोतेसमर्थीसद्गुरुनाथ। तेथेंस्वहस्तेंतीर्थनिर्मित । तेथेंपापाचाहोयअंत । अद्यापवरीपाहती १३० अघटितनाथाचेंविंदान । जडातेंकरि तीचैतन्य । काष्ठेंविहंगापरीयेतउडोन । चितेंतपडतीआपैसें ३१ असंभाव्यचितारचियेली । विप्रकांतावदेते वेळीं । स्वामीसहगमनयेवेळी । मजहस्तीकरवीकां १३२ अवश्यह्मणतीगोरक्षनाथ । वदसीतूंपुरती अर्थ । तुवांअसावेंनिवांत । होईलतेंतूं अवलोकीं ३३ येरीवदेकरुणावचन । स्वामीइच्छींमीशय्यागमन । हाहढनिश्चयकेलामन । सद्गुरुकृपेनेंघडावा ३४ यावरीवदतीसमर्थ । तूंतडागींस्नानकरीयथार्थ । अस्थीपती च्याचितेंत । आणोनियांठेवीकां ३५ यानंतरतेविप्रपत्नी । स्नानकरोनिकासारजीवनीं । येतझालीतेनितं बिनी । नाथामन्निधतेधवां ३६ मगआज्ञापितीतीतें । सत्वरपाचारीस्वपतीतें । आजिजाणवेलतवप्रीतीतें । परीपतीयेईलयेकाळीं ३७ ऐकोनिह्मणेहेंकेविंघडेल । मृत्युपावलापुन्हायेईल । कींकाळमुखांतूनवमील । केवि अघटीतहोयपैं ३८ पुन्हाआज्ञापितीवरदवाणी । स्वपतीपाचारीयेक्षणीं । असत्यवाटेइचेमनीं । सत्यकींविनो

---

१ स्त्री. २ सुकलेलीं. ३ अरण्य. ४ आकाश.

।.लो.। दनेणवे ३९ संशयसमुद्रींपडलीजाण । परीपातिस्मृतीनेंकरीरुदन । ह्मणेप्राणप्रियायेधांवून । धायमोकलीअंट्ट अ०
हास्यें १४० अहाकटकटाप्रारब्धगहन । विधातयाकरिसीनिर्माण । दुरळवनींमोदुर्बळजाण । पतिवीणयेकटी
॥४॥ ४१ कांतांकांतांरींस्वकांतातें । व्यागोनजासीयेकांतातें । करुणानयेहेंतांतातें । याआकांतातयेवेळीं ४२ ॥१०॥
माझाकरूनघात । यांतमेळविसीकायपुरुषार्थ । मीभणंगदीनअनाथ । मजवरीकोपकायसा ४३ गोरक्षवदती
ऐकमाये । नामघेऊनिपतीतेंबाहे । घेऊनयेईनलवलाहें । निश्चयमनींअसोंदे ४४ विश्वश्रवाह्मणोनतेवेळीं ।
दीर्घस्वरेंहाकफोडिली । गोरक्षपुढतीतयेकाळीं । अकस्मातप्रगटला ४५ नामरूपएकत्रता । होतांचतेथेंप्र
त्यक्षता । तैसातोद्विजपुत्रपाहातां । पाहतपाहतांप्रगटला ४६ उदयाचळींभास्करउदय । तेवींउद्भवेब्रह्मत
नय । नमस्कारोनिप्रार्थीविनय । करद्वयजोडोनी ४७ जयजयसद्गुरुनाथउदारा । निजजनमानसचकोरचंद्रा ।
करुणाघनामदयसमुद्रा । सद्गुरुनरेंद्रातुजनमो ४८ भवभयजाभयहारका । अघसंहरणाप्रतापार्का । दुरितद
मनाद्वंद्वनाशका । चित्सुखदायकाश्रीगुरू ४९ यापरीपरिसोनकरुणावचन । श्रीगुरुझालेप्रसन्न । ह्मणेमागेंवर
प्रदान । जेंअपेक्षिततुजअसे १५० येरूविनवीविज्ञापना । स्वामीचुकवाव्याजन्मयातना । प्रपंचस्वप्नदुराशा
मना । अनेककल्पनातरंग ५१ पुत्रमित्रकलत्रसर्व । मायेंतगुंतलेमानव । मनोन्मनीचाअनुभव । कदानेणवे
तयांतें ५२ मजआतांहीअपेक्षा । औदार्यसिंधुदेईभिक्षा । साफल्यहोसीकल्पवृक्षा । अर्पीस्वदीक्षामजप्रती
५३ पुनर्जन्मदीधलामज । याचाअभिमानसर्वेतुज । जन्ममृत्यूमघेऊनपैज । उभवीध्वजचिन्नभीं ५४
गोरक्षवदतीतदोत्तर । अष्टादशवर्णीश्रेष्ठविप्र । वेदाध्ययनींअहोरात्र । सत्काळआपुलाघालवी ५५ संहि
॥४॥ ताअरणब्राह्मणछंद । निघंटाशिक्षाज्याप्रसिद्ध । ज्योतिषव्याकरणअगाध । निरुक्तादिदशग्रंथी १५६
ह्मणेस्वामीदशग्रंथी । ह्याजन्मावरीमुक्तनहोती । अधिकवयघालविती । परीजन्मपंक्तीचुकेना १५७

---

१ मोव्यानें, २ ब्रह्मदेवा. ३ स्त्री. ४ अरण्यात. ५ काळाला. ६ समुद्र.

तरीरब्रह्मजानातिब्राह्मण । हैंतोंवेदश्रुतीचेंप्रमाण । नेणतीसत्यज्ञानाचीखुण । कैसेंनिब्राह्मणतोहोय १५८
जोआत्मज्ञानीब्रह्मनिष्ठ । तोश्वपचअसोपरीवारिष्ठ । लीलाविग्रहीयोगभ्रष्ट । अंतरनिष्ठवंद्यतो १५९
तयाचापाहूनिनिर्धार । वदतीतेव्हांमत्स्येंद्रपुत्र । तुझीकांतोकामांतुर । इसीप्रपंचकरीकां १६० ऐसेंऐको
नवचन । धरूंधावेस्वस्त्रीचरण । ह्मणेतुझेयोगेंकरून । सद्गुरुदर्शनजाहलें १६१ माझेंझालेंपुनर्जनन । सद्गु
रुनाथेंकेलेंपावन । कायवदूंहेंमहिमान । अगाधपुण्यपैतुझें ६२ जन्मोजन्मींस्त्रीभ्रतार । परीनकरवेपातिउ
द्धार । तूंकुलोद्धारिणपरमपवित्र । सुखसर्वत्रतुझेनी ६३ स्वपतीचीमुखवाणी । ऐकोनपश्चातापेकामिनी ।
कैंचापतीकैंचीपत्नी । जेविंस्वप्नींदेखिलें ६४ कंठदाटूनसद्गद । ह्मणेस्त्रीदेहदुःखप्रद । नकोपुनर्जन्मजेराखेद ।
स्वआत्मबोधेंबोधवी ६५ करुणाशब्दश्रवणींपडतां । दयाउदेलीगोरक्षनाथा । ह्मणतीयेतीर्थींस्नानआतां ।
करूनियेईंमजकडे ६६ येतीर्थींचेंआतिमाहिमान । गकारत्रयहेंक्षेत्रस्थान । जोतीर्थींकरीलस्नान । पुनर्जन्म
नहोय ६७ गोरक्षागोमंतकगोरक्षतीर्थ । त्रयगकारदुर्लभबहुत । येथेंहोतांसुस्नात । पाहेप्रचीततूंस्वयें ६८
येरीमस्तकठेऊनिचरणीं । तत्काळप्रवेशलीजीवनीं । तंवतीपुरुषझालीतेक्षणीं । अगाधकरणीनाथाची ६९
ब्रह्मांडकरंडाब्रह्मसृष्टी । स्वयेंरचीजोपरमेष्ठी । तयातेंहीअघटितगोष्टी । तेप्रत्यक्षदृष्टींदाविली १७० दैदीप्य
दिसेदिव्यपुरुष । प्रभाप्रत्यक्षपडेचंडांश । तेविप्रकाशआसमास । भूमंडळांतपडियेला ७१ मगप्रत्यंगप्रणाम।
करिताझालाअतिसप्रेम । सद्गुरुकृपाअतिनिःसीम । फळाआलीअविलंबें ७२ स्तुतिस्तोत्रादिकरूनस्तवन ।
मगमागतीदीक्षादान । तंवदेतेझालेदयाघन । पूर्णकृपेकरूनी ७३ विश्वनाथनामाभिधान । ठेवूनकरितीशृंगी
वादन । दुजयाउमानाथह्मणोन । ठेवितेझालेआवडी ७४ उभयप्रार्थितीउभयहस्तीं । स्वामिचुकविलीपुनरा
वृत्ती । आतांउद्धराव्याप्राप्रती । दर्शनमात्रेंकरूनी ७५ मगह्मणतीकरातीर्थसिंचन । येणेंहोईलतेपावन ।

---

१ स्त्री. २ कामानें व्याप्त. ३ ज्ञातारपण. ४ ब्रह्मदेव. ५ सत्वर.

वरीगोरक्षमोक्षितांजाण । आश्चर्यवर्तलेंपैतेयें ७६ तोंव्याग्रतनूंतूनिअकस्मात । पुरुषप्रगटलादिव्यतेथ । नमनकरूनिस्तवनकरित । गोरक्षातेंतेकाळीं ७७ जयजयमोक्षदायका । जयजयजन्ममृत्युजरांतका । जय जयअज्ञानतिमिरनाशका । भद्रकारकासद्गुरू ७८ यापरीकरितांस्तवन । तोंपातलेंसत्वरविमान । विमानया नींशिवगण । पंचाननदशभुज १७९ नमस्कारितीशिवपार्षद । ह्मणतीगोरक्षमहिमाअगाध । व्याघ्रादेऊनि शिवपद । उद्धारकेलापशूचा ८० त्रिवर्गातेंमोक्षदानी । ह्मणतीबैसोनविमानयानीं । जावेंसत्वरकैलासभुवनीं । शिवसान्निध्यसर्वदां ८१ सद्गुरूतेंवदतीवचन । आह्मानलगेकैलाससदन । आमुचेंकैवल्यगुरुचरण । यावीण आनंअसेना ८२ असोव्याघ्रशिवरूपतेजःपुंज । पंचवदनशोभेदशभुज । कर्पूरगौरमहाराज । अर्धचंद्रमस्त कीं ८३ मौळठेवूनिगोरक्षचरणीं । व्याघ्रआरूढलाविमानीं । व्याघ्रचर्मतेचक्षणीं । शिवगणनेतीशिवातें ८४ विश्वनाथउमानाथ । यातेंसद्गुरुआज्ञापित । तुह्मींजावेंतीर्थातें । भेटीहोतीसिद्धांच्या ८५ धन्यतेगोरक्षयोगे श्वर । धन्यधन्यतेगोमंतकक्षेत्र । धन्यगोरक्षतीर्थपवित्र । अनुपम्यमहिमाजयाचा ८६ हादशमअध्यायपरम पावन । दशेंद्रियहोयउन्मन । कींदशावतारींश्रीभगवान । लीलाकौतुकचोजवी ८७ हेंदशमखंडअविमुक्ती । इतिहासप्रवाहभागीरथी । श्रवणमननस्नानकरिती । तेउद्धरतीनिश्चयें ८८ आजिदशमीचाविजयदिन । श्रोतावक्ताहोयपावन । जन्ममृत्युकरासीमाउल्लंघन । श्रवणकांचनलुटावे ८९ येथेंसमानकरूनबुद्धी । तेचिश मीसाधाआधीं । तेणेंहरतीउपाधी । सिद्धीसाध्यसाधिल्या १९० कींहादशभुजपंचानन । प्रत्यक्षआराध्यउमा रमण । श्रवणमात्रेंकरीपावन । महत्साधनजाणिजे ९१ आदिनाथलीलामृत[illegible] । ऐकतांनासतीत्रिविधताप । विजयलक्ष्मीआपोआप । घरपुसोनयेतसे ९२ श्रीमत्आदिनाथलीलामृतनौका । कर्णधारगुरुभैरवनेटका । आ दिनाथवंदूंतत्पादुका । दशमाध्यायींवंदिला ९३ ॥ ओंव्या ॥ १९३ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १० ॥

१ अज्ञानरूप अंधकार. २ स्थान. ३ दूसरे. ४ कायिक. वाचिक. मानसिक. हे तीन प्रकारचे पाप.

श्रीगणेशायनमः ॥ जोदेवाधिदेवपरमेश्वर । जोपरंज्योतीपरात्पर । जोआदिमायेचानिजवर । श्रीआदिनाथ सद्गुरू १ जेंआदिअनादिस्वसंवेद्य । जेंध्येयहरिहरादिआराध्य । जेंनिगमागम्यपरमवंद्य । तेंसाध्यहोयसद्रूपें २ जेंआदिबीजजगदाकार । जेंशुद्धभूमींविरूढेअंकुर । तेंसप्तभूमीसविस्तर । अनुक्रमेंपरिसिजे ३ त्यासप्तभूमिकाह्मणालक्षण । तरीयोगवासिष्ठश्लोकप्रमाण । त्याचेंहींपरीसालक्षण । अनुक्रमेवदतसें ४ ॥ श्लोक ॥ ज्ञानभूमिःशुभेच्छाख्याप्रथमासमुदाहृता । विचारणाद्वितीयास्यात्तृतीयातनुमानसा । १ । सत्वापत्तीचतुर्थीस्याततोऽसंसक्तिनामिका । पदार्थभाविनीषष्ठीसप्तमीतुर्यगास्मृता । २ । टीका ॥ शुभेच्छाहेप्रथमनिर्धारी । विचारणानामहेदुसरी । तनुमानसाहेतिसरी । सत्वापत्तीचौथीहे ५ असंसक्तीहेपंचमीपाहे । पदार्थभाविनीसहावीहोय । तुर्याभूमीसातवीहे । निश्चयझालावेदोक्ती ६ तरीतेप्रथमभूमिकाकोणती । शुभेच्छाह्मणतीजियेप्रती । तेंहीपरिसायथानिगुती । तत्वमस्यादिमहावाक्य ७ माझेंअज्ञानत्वकैंजाईल । कधींसद्गुरुभेटतील । रात्रदिवसतळमळ । वाहेसदासर्वदा ८ अखंडवैराग्यअंतःकरण । सर्वपदार्थीउदासीन । कंश्रीगुरूतेंरिघेनशरण । शुभेच्छाजाणयानाव ९ सद्गुरुमुखेंविवरण । महावाक्यादिकरीश्रवण । तदनुसारकरीआचरण । नसेविचारदुजाही १० निर्विषयझालियामनीषा । ऐहिकाचीजयानैराश्या । श्रवणींआवडीवैराग्यदशा । तनुमानसाहेतिसरी ११ श्रवणमनननिजध्यास । हेतोन्हींसाध्यहोतीजयास । साक्षात्कारहोयतयास । विचारासिजोपावे १२ सम्यक्ज्ञानक्रियासहित । तेणेंचिपावेमनविश्रांत । सत्वापत्तीहोविख्यात । चतुर्थभूमीजाणिजे १३ पदार्थमात्रदृश्यमान । कदांनगुंतेजयाचेंमन । सदाआनंदींनिमग्न । असक्तीहेपांचवी १४ पंचभूमीवोलांडुन । पुढेंअवशिष्टज्ञानजाण । भासेपदार्थीचिन्मयचैतन्य । पदार्थभाविनीषष्ठमहे १५ साहावीभूमिकाअनुभव । भेदाभेदनिरसिलासर्व । स्वस्वरूपींस्वयमेव । सातवीतुर्यापैं १६ हेंभूमिसप्तकशोधन । शुद्धभूमिपाहिजेजाण । शुद्धभूमीबीजारोपण । सद्गुरुवाक्यठसावें १७ भूमीच्छाहेमूळकारण । येचविषयींनिरूपण । श्रोतींकरावेंएकाग्रश्रवण । महदाख्यानगुरसजें १८ सुदर्शनआणिलीला

वती । गेलींबदरिकाश्रमाप्रती । इकडेचंद्रचूडसुभद्रनृपती । स्वनगरातेंजायतेकाळीं १९ चंद्रचूडराज्याधिप
ती । सुभद्रयुवराज्यनीती । चालवीतसेपरमप्रीतीं । प्रजापाळींसर्वस्वें २० चंद्रचूडभोगीराज्यभोग । परीअं
तरींशुभेच्छावैराग्य । गुरुचिंतनाचाअनुराग । सदांवाहेअंतरीं २१ जेंविविरहिणीपतिवियोग । मानीखदिरांगार
विषयभोग । कांहींपदार्थगोडनलागे । तळमळवाहेअंतरीं २२ तयानरुचेशयनवसन । नरुचेमिष्टमिष्टाशन । गुरुद
र्शनींवेधलेंमन । उत्कंठितआतुरपें २३ ऐसेलोटतांकांहींदिवस । निश्चयजाणूनजगन्निवास । आपुलेंऋणफेडावया
स । सद्गुरुकृपेंभेटती २४ गतकथाध्यायींचाइतिहास । प्रत्यक्षकेलास्त्रीचापुरुष । विश्वानाथनाथउमेश । गोर
क्षदेतीभिक्षेतें २५ तोव्याघ्रझालाशिवरूप । पशूनेंकायकेलेंउग्रतप । शीघ्रसद्गुरुप्रताप । सायुज्यपदींस्थापि
ला २६ तेंव्याघ्रचर्मपरिधान । तत्काळकरीतोउमारमण । ऐसेंसद्गुरुमहिमान । कितीह्मणूनवदावें २७ गोमं
तकगोरक्षतीर्थ । जेंवींप्रयागगयागोकर्णविख्यात । गोकुळगोवर्द्धनपर्वत । तेवींक्षेत्रहोयतें २८ नरुचेशयनवसन ।
नरुचेमिष्टमिष्टाशन । गुरुदर्शनिवेधलेंमन । उत्कंठितआतुरपें २९ असोतेथूनउतावेळ । गमनकरितीदीनद
याळ । येतेझालेतत्काळ । निषधदेशींगोरक्ष ३० इंद्रपुरीनामेंनगरी । पुरींप्रवेशलेदीनोद्धारी । तोंचंद्रचूडउप
रीवरी । सहजस्थितीपाहतसे ३१ नगरगर्भातूनिदूरी । दृष्टीगेलीनाथावरी । वृत्तिझालीतदाकारी । मनोवेधें
वेधली ३२ भिक्षामागतांनगरांत । तंवप्रवेशलेराजालयांत । दृष्टींदेखिलासद्गुरुनाथ । हर्षयुक्तयेतसे ३३ झा
आठवनाठवविसर । वृत्तितन्मयतदाकार । विसरपडलाआपपर । देहभावमावळला ३४ लवडसवडीउतरेसो
पान । करितांझालासाष्टांगनमन । वोवाळूनपंचप्राण । अर्थभूतप्रार्थित ३५ ह्मणेउदेलेंपूर्वपुण्य । पूर्वकृतसु
कृतप्राक्तन । सद्गुरुवोळलेअमृतघन । मजचातकातेंयेवेळीं ३६ मृत्युसमयींअमृतपान । जेंविनिर्जीवासंसजी
वन । तेविझालेंसमर्थागमन । मगलाभणेंकायतें ३७ जेविंइंदिरायेतमंदिरीं । दरिद्रपळेतत्काळदुरी । कींक्षुधार्थिया
चेघरीं । क्षीरसिंधूपातला ३८ तवमहिमानेणतीप्राकृतें । मीकृतार्थपूर्वसुकृतें । सुकृतकृपाकरोनमातें । द

शंनमात्रेंउद्धरी ३९ जयाध्यातीयोगीजन । जयास्तवसेवितीघोरविपिन । सिद्धसाधितीरात्रादिन । तेंत्वारित
मजद्यावें ४० क्षणांतब्रह्मसाक्षात्कारें । सत्वरअनुभवचमत्कार । मजपडोनदेहाचाविसर । ब्रह्मानंदींनांदवी ४१
संकेल्पविकल्पात्मककेवळ । मननराहेनिश्चळ । मनोवेगअतिचपळ । नसेस्थीरक्षणभरी ४२ बंधमोक्षासिका
रण । एकमनचिहोयप्रमाण । मनएकाग्रझालियाविण । साधनव्हेसाधका ४३ पादचारीगगनीगमन । हेंही
होईलकाळेंकरून । परीएकाग्रतेसमन । कदानयेकल्पांतीं ४४ कोंठराहिलसमाधिस्थ । हेंकेंविंघडेअघटीत ।
कींजळींमत्स्यनिवांत । राहीलकैसास्वामिया ४५ यावरीवदतीदीनदयाळ । गुरुवचनीविश्वासअढळ । तरीं
पावेकैवल्यफळ । निश्चयेंसीजाणपां ४६ निश्चयाचेंहोयबळ । तरींमनकायेतुलेंचपळ । निश्चयराहीलनिश्चळ ।
तरींअचळसुखातेंपावती ४७ स्वस्वरूपींहोतसेलय । तेव्हांवासनेचाकेलाक्षय । मनकरीअनेकअपाय । मग
साधनकेंविघडेल ४८ चंचळचपळदुरावर्त्तमन । जोसृष्टीकर्ताचतुरानन । केलेंकन्येतेंअवलोकन । स्मरणस्फुरण
तयातें ४९ तरींमननिग्रहाचेवंदीं । घालूनसाधीकार्यसिद्धी । तेणेंचिसाधेआत्मसिद्धी । इंद्रियउपाधीनसेची
५० तुजमनाचीचांचल्यताशंका । तरीपरिसीनिग्रहकुंचिका । सांगतोंतुजवचनएका । नएकेसर्वथामनाचें ५१
मनाचेछंदींनलागावें । मनजाईलतेथेंनजावें । मनपाहीलतेंनपाहावें । मनकोंडावेंनिश्चय ५२ मनाच्याकल्प
नाविकार । परमदुर्धरअविचार । करीनित्यानित्यविचार । धरीनिर्धारगुरुवचनीं ५३ अरेहेंमनब्र
ह्मींचाअंश । ब्रह्मनदिजेसामरस्य । चुकोनआलेंस्वस्वरूपास । जेथीलतेथेंलावीकां ५४ जैसाजीवनां
तीलमीन । कदाकर्दमींनराहेक्षण । तोशोधीपूर्वस्थान । तेंविमनउन्मनकरीहें ५५ ऐसेंबोलोनितयेवेळे ।
तयाभ्रूसंधीभस्मचर्चिलें । अलक्षींलक्षलाविलें । मगगुप्तझालेगोरक्ष ५६ पहातपाहतसमाधी । वृत्तिगुं
तलीपरमानंदीं । विरोनगेलीदेहबुद्धी । तटस्थतिष्ठकाष्ठवैं ५७ झालाएकचिहाहाकार । पाहूंपातलेनारी

१५ १ मनांमध्ये कोणताही निश्चय करणे यास संकल्प अशी संज्ञा. २ आत्मानित्य व शरीर अनित्य. ३ चिखलात.

नर । सुभद्रबंधूधांवेसत्वर । वक्षस्थळबडवित ५८ वृद्धवृद्धतेथेंयेतो । अनेककल्पनातर्ककरिती । पहाअक
स्मातरायाप्रती । कायझालेंकळेना ५९ एकह्मणतीधराधरा । एकउपवस्त्रेंघालितीवारा । एकह्मणतीराजेश्वरा ।
अकाळमृत्युपावला ६० कोणीह्मणतीवायुचिन्ह । कोणीह्मणतीपूर्वप्राक्तने । एकह्मणतीपिशाचझडपण । कीं
कुळदैवतक्षोभलें ६१ एकह्मणतीनव्हेऐसें । रायासींझालासर्पदंश । कींदुष्टग्रहदुष्टदोष । किंवामंत्रचळलाअसे
६२ वैद्यवैदिकापंचाक्षरी । उतारेमांत्रिकधन्वंतरी । गणितज्योतिषीअहोरात्रीं । बैसविलेसुभद्रें ६३ संत
तधारातेब्राह्मण । बैसविलेविग्रहकरून । मृत्युंजयाचें अनुष्ठान । करितेझालेमांत्रिक ६४ निग्रहनवग्रहादिहवन ।
कोणीह्मणतीपवमान । कित्येककरितीवेदपठण । उपासितीउपासना ६५ गाणपत्यआराधितीगणपती । शाक्त
ध्यातीमहाशक्ती । शैवसेवितीपशुपती । वैष्णवध्यातीविष्णूतें ६६ सौरसविताआराधन । उपस्थानसूक्तेंअनु
ष्ठान । स्तोत्रमंत्रयंत्रेंसाधन । गंडदोरेअंगारे ६७ सप्तशतीचेंकरितिपठण । सप्ताहभागवतपारायण । कार्त
वीर्यबटुभैरवआराधन । नारसिंहमारुती ६८ नगरनागरिकप्रजाजन । सर्वहीहोतीउद्विग्नमन । महत्प्रळयवोढ
वलापूर्ण । सुभद्रायत्नकरितसे ६९ ऐसानृपवरचिंताक्रांत । प्रधानासीविचारकरित । ह्मणेवोढवलाअनर्थ ।
उपायकांहींसुचेना ७० चिंताग्रस्तनृपविकळ । रात्रदिनकरितळमळ । ह्मणेप्रयत्नातेंनहोयफळ । शुष्कवृक्षासा
रिखें ७१ वाहावलोंचिंतार्णवप्रवाहीं । मजत्रातासर्वथानाहीं । कोणधांवेलऐसेसमयीं । दुर्धरअपायींपडियेलों
७२ यापरीलोटलेसप्तदिन । अंतरींपेटलाचिंताकृशान । अकस्मातपूर्वस्मरण । होतेंझालेंतयातें ७३ ह्मणेज
याचियेवरदवचन । आह्मांउभयतांझालेंजनन । जेणेंजीवनींप्राणदान । देऊनरक्षिलेंमजप्रती ७४ मातेतेंदेऊ ॥२॥
निदिव्यांबर । केलामातृपितृउद्धार । आणिदेतेझालेवरदवर । गोरक्षयेतीलह्मणोनी ७५ तोंमहाराजगोरक्षना

---

१ दैव. २ शनि वगैरे पापग्रह पीडा. ३ देवीचे उपासक. ४ शंकराचे उपासक. ५ विष्णूचे उपासक ६ अग्नि

थ । प्रतापजयाचाजगविख्यात स्मरतांसत्तहीप्रगटहोत । कोणकोणतेंऐका ७६ ॥ श्लोक ॥ श्रीदत्तोनारदो
व्यासःशुकश्चपवनात्मजः । कार्तवीर्यश्चगोरक्षःसप्तैतेस्मृतिगामिनः १ ॥ टीका ॥ श्रीदत्तनारदबादरायण ।
शुकाचार्यादिहनुमान । कार्तवीर्यगोरक्षजाण । स्मरणेंप्रगटतीसत्तही ७७ ऐसीअसतांजयांचीकीर्ती । तरीकां
नपवेएकांतीं । तोंनिशेसरतांजेंविंगभस्ती । उदयायेतजाणपां ७८ ऐसेस्मरतांनिजकैवारी । प्रगटतेझालेदी
नोद्धारी । अलखकरोनिउच्चारी । द्वारप्रदेशींगोरक्ष ७९ तेजःपुंजदैदीप्यदीप्ती । जयाचीस्वप्रकाशअंगकांती ।
अरुणवर्णवसनेंविलसती । भव्यभस्मचर्चिलें ८० विशाळभाळआकर्णनयन । सुप्रभमुद्रामंडितश्रवण । कुब्ज
कमंडलुमृगाजिन । पदींपादुकामिरवती ८१ सरळशैलीरुळेगळां । शोभेभगवीभूषितमेखळा । कुक्षींझोळीक
रींमाळा । त्रिशूलपाणींविराजे ८२ वीरंगुंठीअतिशोभली । कुंतलमुकुटींविराजली । शृंगीवाद्यतयेवेळीं । अ
नुहतगजरींवाजती ८३ मुक्तमुमुक्षुविषयीजन । पाहूनकरितीसाष्टांगनमन । ह्मणतीआदिनाथकींआदिनाराय
ण । दर्शनदेऊंपातले ८४ शुककिंवावामदेव । कपिलसिद्धदत्तात्रेय । सनकसनंदनब्रह्मतनय । सनत्कुमारअ
सेल ८५ स्त्रियावदतीधन्यजननी । प्रसवलीरत्नवैडूर्यमणी । सकुमारकुमारसुलक्षणी । ऐसेंनिधानदेखिलें ८६
अल्पवयांतदीक्षाग्रहण । यासीद्यावयाकायकारण । प्रपंचत्यागूनमनकठिण । कांझालेंहेंकळेना ८७ एकवदे
नव्हेमानव । अंशरूपेंप्रगटेदेव । उमाधवकिंवारमाधव । अनुष्ठानेंप्रगटले ८८ पूर्वीलीलावतीतेंमत्स्येंद्र । अ
र्पितेझालेकनकांबर । त्याचेवरदेंवरदपुत्र । उभयांसीउभयजाहले ८९ एकबुडालाजळांत । तोहीआणिला
स्वसामर्थ्यें । आतांहीआलाअकस्मात । परीत्याजऐसादिसतो ९० ऐसेबहुतमतांचेत्रिविधजन । करिती
स्वबुद्धीअनुमान । परिनिर्देशाचीनिश्चयखूण । जीवकविनेणती ९१ वार्ताप्रगटलीनृपश्रवणीं । तत्काळआ
लालोटांगणी । विनीतहोऊनिबद्धपाणी । नम्रवाणीवदतसे ९२ जेवींचातकाबोळलावन । तेंवीस्वामीचेंआजि

१ रात्र. २ सूर्य. ३ शेंदी. ४ शंकर. ५ विष्णु.

दर्शन । कृतसंकल्पझालेपूर्ण । कृतार्थझालोंआजिमी ९३ प्रधानप्रार्थीकरजोडून । रावपडिलागतप्राण । आ
जिझालेसप्तदिन । कृपावलोकनकरावें ९४ भगीरथप्रयत्नसाधेसिद्धी । नेणोकायलिखितप्रारब्धीं । ऐसेंसंकटीं
दयानिधी । स्वानंदउदधीलोटले ९५ अवश्यह्मणतीगोरक्षनाथ । तोंमंचकींमुमूर्षनृपनाथ । देखूनसत्कृपावि
लोकित । शृंगीश्रवणींवाजवी ९६ ब्रह्मानंदीब्रह्मरंध्रीभेद । नादहोतांझालासावध । तत्काळउठोनचरणारविंद ।
जेविंषट्पदझेंपावे ९७ जयजयकारेंपिटोनिटाळी । आनंदलीभक्तमंडळी । ब्रह्मानंदनादनिगळी । तयेवेळीं
गाजला ९८ पौरजजनकनकसुमनीं । वोपितेझालेअनर्घ्यरत्नीं । नीचयातीविविधदानीं । तोषविल्याअपार
९९ मंगळवाद्येंवाजतीतुरें । उल्हाटयंत्रांच्याभडमारे । धूम्रकोंदलाएकसरें । भ्रांतिनिशाभासली १०० शर्क
राभरोनिद्विरदावरी । हर्षेवांटितेझालेनगरीं । अक्षयवाणेंसौभाग्यनारी । करित्याझाल्याआवडीं १ हारिद्राकुं
कुमअंतःपुरीं । राजभार्यातेअवसरीं । वाणेंवसनेंअलंकारीं । द्विजांगनातेंपैंदेती २ भांडारेंफोडोनिसमग्र । तो
षविलेधरामर । देवघोषेंगाजेअंबर । आशीर्वादद्विजदेती ३ असोआनंदवर्तलाअपार । चंद्रचूडजोडूनिकर ।
स्तवनकरीवारंवार । सद्गुरूचेंतेवेळां ४ जयजयसद्गुरुनिर्विकारा । मायाविपिनवैश्वानरा । उन्मनकारकाजगदो
द्धारा । परात्पराश्रीगुरू ५ जयजयद्वंद्वद्विरदविदारणा । क्रोधअहिनिकृंदसुपर्णा । मदमदनांतकाभाळलोच
ना । त्रिदोषशमनागुरुवर्या ६ जेविंलोहाचेंशुद्धकांचन । तेविंकेलेंमनउन्मन । याकृतोपकाराउत्तीर्ण । प्राणमांड
णेंपमाझें ७ मीमजमाजीहरपलों । माझामजमाजीसांपडलों । सद्गुरुमाहात्म्यकायबोलों । सुखपावलोंस्वस्वरूपीं
८ मृगजलवत्हाभवसमुद्र । त्यांततनुनौकानवछिद्र । इचाविश्वासक्षणमात्र । मजनसेगासर्वथा ९ आत्मसाधना
वीणशरीर । प्रेताजेविंअलंकार । स्मशानींचेंभग्नपात्र । कायउपयोगतयाचा ११० निरर्थकाचेंसार्थक । कर्ताएक
गुरुनाथ । भिक्षामागूंपातलोंरंके । अवश्यकमजदीजे ११ आतांपुरेहाभवदुस्तर । अधोगतीचीवेरझार । उर्ध्वगती

---

१ भ्रमर. २ हत्तीवर. ३ मायारूप अरण्यनाशक अग्नि. ४ शरीर रूपी तारूं. ५ दरिद्री.

राहेस्थिर। ऐसेंकरीगादयाळा १२ तूंगोइंद्रियांचानियंता। इंद्रियेंमाझींरक्षीआतां। गुरुगोरक्षनामधर्त्ता। ब्रीदा
भिमानतुजलागीं १३ गोरक्षगोरक्षकरितांस्मरण। स्मरणेंतुटेजन्ममरण। तयासींहोयकैवल्यपण। माळघालीमो
क्षश्री १४ मंदस्मितबोलतीवचन। बापायोगहापरमकठीण। आमंत्रणअसोनिभिक्षाटण। कांइच्छिसीसु
जाणा १५ ऐश्वर्यसंपन्नसंपत्ती। त्यागूनिभोगावींवैराग्यविपत्ती। हेंअयोग्यगातुजप्रती। सांगूंकितीतुजलागीं
१६ राज्यभोगऐश्वर्यविषय। त्यागूनइच्छिसीवैराग्यविषय। त्यांतकैसापावसीसंतोष। दुःखप्रदयोगहा १७
अनेकतपाचरणकरून। राज्यभोगसुखसंपन्न। पावूनत्यांचात्यागकरणें। हेंअयोग्यलौकिकीं १८ तरीसांगतो
ऐकविचार। प्रपंचींपरमार्थघडेसुंदर। अतिथिअभ्यागतसाचार। गृहस्थधर्मींघडेकीं १९ येरुवदेनिश्चयवा
णी। देहअर्पिलासद्गुरुचरणीं। आतांप्रपंचाचीकाहाणी। नाइकेश्रवणींसर्वथा १२० जरीगुरुपदींअसेलनिर्धार।
तरीचकरितीस्वामीउद्धार। ऐसेंवदोनिनमस्कार। दंडप्रायघालित २१ निश्चयपाहोनियांथोर। वदतेझाले
वरदोत्तर। चीरंजीवचंद्रार्कवर। योगसुखातेंभोगिसी २२ नकरीसाधनाचेसायास। जपतपनेमाचीहव्यास।
स्वसुखभोगीअसमास। निमग्नराहींस्वानंदीं २३ नलगेकर्मठपणाचाखटाटोप। नलगेजपतपाचासाक्षेप।
मुख्य।हिजपश्चात्ताप। जेणेंत्रितापनासती २४। श्लोक। मुंडणचोपवासंचतीर्थयात्रांतथैवच। अग्निहोत्रंचसन्या
संनाथपंथेविवर्जयेत १। टीका। मुंडणंआणिउपोषण। नलगेकरावेतीर्थाटण। अग्निहोत्रसंन्यासजाण। नाथपंथी
वर्जेहे २५ नाथसांप्रदायमहिमापरम। स्वयेंचिहोयपरब्रह्म। नकळेनिगमाहेंवर्म। नाथधर्मअगाध २६। श्लोक।
सन्न्यासीचयोगीचननिरग्निर्नचाक्रियः। टीका। षष्ठमोध्यायींगीताकार। अर्जुनावदेशार्ङ्गधर। सन्यासीआ
णियोगीश्वर। निरग्निक्रियाउभयांची २७ अर्जुनाभिन्नमार्गहेदिसती। निदानींतरीएकवटती। जेवींगंगाप्रवा
हभिन्नअसती। ऐक्यहोतीएकची २८ एकावृक्षादोनलतां। उभयदिसतीपाहूंजातां। तैसासंन्यासआगि

१ गोह. शब्द इंद्रिय वाचक २ शरीर. ३ काम ४ निराळे. ५ झाडें. ६ वेल.

 नाथपंथा । भेदसर्वथाअसेना २९ ॥ श्लोक ॥ आदौजटिलसंन्यासादत्तोनारायणःशिव । दुर्वासोवामदेवश्चभरतः 
कपिलस्तथा १ श्वेतकेतुर्द्रुहिणजःसनत्कुमारएवच । इत्यादयस्तेजटिलासंन्यासेक्षौरवर्जिताः २ टीका । जटिल
 संन्यासीतेकवण । एकअनुक्रमेंअभिधान । आदिनाथआदिनारायण । दत्तात्रेयवामदेवजो १३० शिवदुर्वासा 
सिद्धवत । ऋषभपुत्रनामेंभरत । कपिलआणिश्वेतकेत । ब्रह्मपुत्रसनत्कुमारपैं ३१ दंडीमुंडीशुचिष्मंत । शौच
ज्ञानीसदानिरत । अग्निहोत्रीभिक्षानाथपंथ । भेदसर्वथाअसेना ३२ संन्यासजटिलीमुंडित । आणियोगधर्म
नाथपंथ । तुजसांगितलायथार्थ । तदनुसारआचरेतूं ३३ पाहतांहाभ्रममूळभेदभास । वागुलभावनाअज्ञाना
स । कींमृषामृगजळमृगास । असत्यसत्यभाविती ३४ ॥ श्लोक ॥ भ्रमेणाहंभ्रमेणत्वंभ्रमेणोपासकाजनाः । भ्रमे
णदेवताःसर्वाभ्रममूलमिदंजगत् ३ ॥ टीका ॥ भ्रममूलहेंमीतूंपण । भ्रमेंअनेकउपासनाकरून । भ्रममूलदेवता
र्चन । संपूर्णजगभ्रममूल ३५ ब्रह्मास्मिअहंस्फुरण । तेचिजाणअपरोक्षज्ञान । भरोनउरलाआपआपण । भेद
भाननसेची ३६ पूज्यपूजकनद्वैत । ध्येयध्याताकैचेंदैवत । अखंडसबाह्यओतप्रोत । त्रिपुटीसमूळविराली
३७ ध्येयध्याताआणिध्यान । ज्ञेयज्ञाताआणिज्ञान । कार्यकर्तृत्वकारण । निरसूनजातीआपैसी १३८ श्लोक
यानिशासर्वभूतानांतस्यांजागर्तिसंयमी । यस्यांजाग्रतिभूतानिसानिशापश्यतोमुनेः ४ । टीका ॥ तेथेंजगत
सर्वजागृत । तेथेंयोगीसमाधिस्थ । जेव्हांजगहोयनिद्रिस्त । योगीजागतीनिश्चयें ३९ निद्राजिंकी
गुडाकेश । दुजाजोगोरक्षयोगीश । सदांजागृतअविनाश । सत्यशाश्वतवर्त्तत १४० अधःपृथ्वी
ऊर्ध्वआकाश । उभयसंधीगोरक्षवास । त्रैलोक्यगमननिरवकाश । आशापाशरहितजो ४१ तोमहाराज
दीनदयाळ । स्वयेंकथिलेंज्ञानप्रांजळ । तात्काळसद्गदनृपाळ । वैराग्ययुक्तजाहला ४२ सकपहोऊन 
तेक्षणीं । कृपाकटाक्षमोक्षदानी । दीक्षाअर्पिलीनाथभूषणी । अलक्षोच्चारगाजला ४३ मुकुटकुंडलें
सर्वत्यागी । भस्मलेपितसर्वांगीं । कर्णीमुद्राशैलशृंगी । भव्ययोगीप्रगटला ४४ मस्तकठेवू

नसद्गुरुपदीं । निवासकरीअक्षयपदीं । जेथेंनसेआधिव्याधी । स्वानंदउदधिसंगमीं ४५ नामठेविलेंचर्पटनाथ । पुन्हांतयातेंआज्ञापित । जडमूढउद्धरीशरणागत । गमनतुझेंत्रिलोकीं ४६ यापरीअर्पूनप्रसादवचन । पाव तेझालेअंतर्धान । पुढिलेकथेचेंनिरूपण । परमरहस्यपरियेसा ४७ हाअध्यायएकादश । कीहेप्रत्यक्षरुद्रए कादश । कींदशइंद्रियांतएकादश । मनउन्मनहोयपैं १४८ कींयेग्रंथींएकादशी । जेंविव्रतांतश्रेष्ठएकादशीं । जेपावतीकैवल्यपदासी । तैंविएकादशअध्याय ४९ आदिनाथलीलाग्रंथचंद्र । श्रवणार्तश्रोतेश्रवणचकोर । विक सितश्रवणमुखेंअहोरात्र । कथाबिंदूइच्छिती १५० हाग्रंथमानससरोवर । वेष्ठितश्रोतेमराळचतुर । मुक्ताफळां चासेवितीआहार । उत्तरोत्तरस्वानंदें ५१ केवळग्रंथहाकल्पवृक्ष । जेआर्तधरोनियेतीमुमुक्ष । तयांसाफल्य श्रीगोरक्ष । जोसर्वसाक्षिसद्गुरू । ५२ श्रीमत्आदिनाथलीलासुरस । भैरवसद्गुरूचाचिद्विलास । तत्सत्तेंआदि नाथइतिहास । एकादशांतवर्णिला ।। १५३ ।। ।। श्रीकालभैरवार्पणमस्तु ।। ।। अध्याय ।। ११ ।।



अध्याय १२ वा ।।

श्रीगणेशायनमः ।। ।। श्रीआदिनाथनिरंजन । जोपरब्रह्मपुरातन । निर्विकारविहीन । परंज्योति परमात्मा ।। १ ।। वस्तुतःपाहतांभांगार । अलंकाररूपेंअवतार । मत्स्येंद्रगोरक्षजालंधर । चर्पटीचौ रंगीमिरवले ।।२ ।। जटामस्तकींमत्स्येंद्रमुकुट । गोरक्षअर्धचंद्रतोसुभट । तृतीयनेत्रजालंधरउद्भट । परममंडि तभूषणीं ३ चर्पटीचौरंगीउभयश्रवणीं । मुद्रजडिलेसुनीळवर्णी । पूर्वउत्तरमीमांसादोनी । सहस्रकिरणींडवरले

सुवर्णतगटींझोळीवरी । कमंडलुपात्रहेमाचें ८३ यावरीवदेयोगेंद्रनिश्चिती । राजविषयाचीझालीशांती । पुन्हा स्वीकारमागुती । घडेलकैसाजननिये ८४ विषयकांताकांचन । हेंचिनरकाचेंसाधन । नचुकेकाळाचेंअदान यमबंधनपरिणामी ८५ जन्ममृत्युजरापाही । आह्मानसेकाळत्रयीं । गुरुकृपेंझालेविजयी । देहविदेहीअसोनी ८६ विरंचीरचितचतुर्दशभुवन । मगकासयानिर्मीतनूतनसदन । पृथ्वीप्रकाशविस्तीर्णआसन । गगनमंडप उभविला ८७ सप्तसमुद्रपरिघावर्त । दीपिकाशशिसूर्यप्रकाशित । मंगळतुरेंमंजुळअनुहत । अखंडध्वनीअ क्षयी ८८ अष्टदिशास्तंभदिक्पाळ । माजिअनळवाहेमंजुळ । अनेकनद्यांचेप्रवाहतुंबळ । वाटिकावृक्षसफळते ८९ चतुर्दिशांचीद्वारेंमुक्त । प्रतिबंधनसेकिंचित । विहारक्रीडावनवसंत । पत्रींपुष्पींडवरले ९० उष्णसंतप्त होतांदेख । मेघसिंचितीमेघोदक । हेमंतऋतूचेंपरमसुख । गिरिगुहादिकसुस्थळें ९१ पंचतत्वांचीकंथासाजिरी । षड्चक्रठसेअभ्यंतरीं । धुनीब्रह्माग्नीअहोरात्रीं । दग्धकरीकर्मातें ९२ कामक्रोधमारूनवैरी । झालोंसाम्राज्याधिकारी । त्रिदशातिष्ठतीजोडलेकरीं । सत्तात्रिभुवनींआमुची ९३ भूमीशय्याभुजउशी । नभचांदवाचंद्रप्रकाशी । नक्षत्र ठसेआकर्शी । ब्रह्मांडमंडपसाजिरा ९४ दिशाअवर्णतेंप्रावरण । शांतीस्वस्त्रीआलिंगन । उन्मनीचेंअवलंबन । निमग्नसुखेंतुर्येचें ९५ बारासोळानितंबिनी । आणिदशकन्याकामिनी । सत्रावीतेंमुख्यजननी । अखंडपाणीतो षवी ९६ करतळींसेवूनभिक्षान्न । तरुतळींसुखेंकरूंशयन । किंवापाहोनिपुलीनं । इच्छानंदेंविचरावें ९७ सुभगा शुभांगिबोलेप्रिया । केवित्यागिसीआमुतेंराया । तुजवीणयौवनेंजातीवांया । पाहेनरवर्याभूपती ९८ विरहकांता रीत्यागिल्याकांता । कांपाहासीयाआकांता । चिंतार्णवींपडलोंसर्वथा । हेंदुःखसमस्तांनसाहे ९९ त्रियाअंतोरावांचोन । दिव्यकामिनीदिसेदीन । जेविस्मशानींचेभग्नभाजनं । निरर्थकाचिजाणिजे १०० देवांगनातेंतवांगनामान्य । चंचलसरोरुहेपेक्षनयन । तारुण्यलावण्यअगण्य । नवयौवनसुनम्रा १ हाटकवर्णीतनुधारिणी । मृगशावाक्षी

१ स्त्री व सोने. २ आहुति. ३ वृद्धपणा. ४ ब्रह्मा. ५ घर. ६ आकाश ७ तीर. ८ चितारूपी. ९ समुद्र. १० पात्र. ११ कमल.

गजगामिनी । जीतेंदेखोनिसलज्जपद्मिनी । रत्नभूषणींमिरवल्या २ सुंदरीत्यागोनिदेरीसेवन । गमनकारिसीटा कोनभुवन । व्यर्थलंघूपाहासीवन । कायतेंसाधननेणवे ३ ललनाशृंगारवनवसंत । तदांगेंश्वापदेंअसतीबहुत । तूंनृपयेथीलरतिकांत । स्वेच्छेंक्रीडाकरीकां ४ कांताकाननींकुरंगनयनी । ह्याचभावीकुरंगिणी । सलंबवेणी कृष्णसर्पिणी । मस्तकींमणीविराजे ५ अधरबिंबफळकरिनासिक । मंजुळशब्दींभासेपिक । उभयस्तनतेच क्रवाक । चित्तचातकघनइच्छी ६ चतुर्वर्तुळेंगंडस्थळ । भुजशुंडाबाहुसरळ । मत्तमातंगतेकेवळ । सिंहमध्या विराजवी ७ तुंगेस्तनतवकरस्पर्श । वांछितीतयानकरींनैराश्य । यावरीवदेतोनरेश । तयेप्रतितेकाळीं ८ पीनस्तनतेमांसग्रंथी । कनककलशतयांतेंवदती । मुखींश्लेष्मावाहेपरीभाविती । रोहिणीपतीराकेंदु ९ पाहतां मळमूत्राचेंस्थळ । वस्तुतःतेंअमंगळ । निंद्यतेंवंद्यकेवळ । परमलाभमानिती १० अंगनारूपेंहेंकरंडी । मळ मूत्राचीचतेहंडी । सद्बोधातेंविखंडी । नरककुंडींपचवीत ११ विद्युल्लतेपरीभोगचंचळ । कींआयुष्यवातेंअभ्र वितळ । धनयौवनदारासकळ । क्षणभंगुरअसती १२ आह्मीसप्तद्वीपींचेराज्याधिकारी । भिक्षामागूंघरोघरीं । मातृन्यायसर्वनारी । भिक्षाभातुकेंअर्पिती १३ मगचंद्रावतीबोलत । रायावदसीसर्वहीयथार्थ । परीआमुचेंहें चिमनोगत । सेवेसींनिरंतरअसावें १४ कोणकरीलचरणक्षाळण । कोणदेईलक्षीरोदकपान । कोणकरीसवेंश यन । मनरंजनकोणकरील १५ गंगायमुनासरस्वती । सहजचरणक्षाळणेंहोती । गृहींगृहींक्षीरोदनेंदेती । पर मप्रीतीकरोनी १६ कंदमूळपर्णसेवन । किंवावातांबुकरीप्राशन । तृणशय्यामृगाजिन । हेंचिआस्तरणआमुचें १७ पुढेंनिजेकुब्जाराणी । भोगभोगूंसदांउन्मनी । अनुहतकिंगरीवाद्यध्वनी । तन्मयनिमग्नरंजवी । १८ परब्रह्मींलागतांचवी । इतररसरुचतीकेवी । विदेहस्थितीअसतांबरवी । मगगगनांबरप्रा

१ गुहा. २ उंच ३ चंद्र ४ दूध व उदक ५ हरणाचें चर्म.

वरणें १९ विषयानंदाहूनआनंद । अनुपम्यहाब्रह्मानंद[1] । सकळसुखाचाआनंदकंद । सदासद्बोधअंत
रीं १२० निर्धूमअग्निपरीवैराग्य । त्यागोनियांविषयसंग । दृढतरहोवोनियोगानुराग । अभंगबोधठसा
॥४॥ वला १२१ जयाचेंवैराग्यदेखोन । शुकसनकादिकमान्य । करितीमस्तकआंदोलन । धन्यझालेकलियुगीं ॥२१॥
२२ परेहूनिजेपरात्पर । निरंजनवनींकरीविहार । जेथंनसेआपपर । तेंचिस्थळतयाचें २३ कांताकनकरा
ज्यासन । जेणेंत्यागिलेंजेविवमन । पुन्हांनकरीतयाचेंग्रहण । मनेंवीटघेतला २४ पूर्वपुण्याचासंस्कार । ह्म
णोनिविषयांतिरस्कार । नकरीजोस्वीकार । तोचिईश्वरजाणिजे १२५ द्रव्यघटदुरळवनीं । लाभझालिया
नपाहेनयनीं । कींशरणआलियादिव्यकामिनी । परीतीतेंजननीभावित २६ ऐसेनिश्चयाचेपुरुष । तेचिजा
णावेविष्णुअंश । ज्यानीत्यागिलाआशापाश । तेचिईशदेवाचे २७ इहींचिन्हींजेउद्भट । तयांभवाब्धीपाय
वाट । लंघोनिरजतमाचाघाट । फुटेपाहाटतुर्यांची २८ जाळोनिसंचितक्रियमाण । तेचिस्वस्वरूपींरममाण ।
तयांचेंकायवदूंमहिमान । जाणतीखूणगुरुपुत्र २९ तयाक्षुधाकोठेंगेली । आणितृषाकोठेंहरपली । निद्राकोठें
अदृश्यझाली । झालीपरीऐसीहे १३० असोपटझाडोनिजायनेटका । कांताकटकालावूनिचुकटा । कटकटाप्रार
ब्धाकरीसुटका । प्राणघेईकांआमुचा ३१ विरहव्याळाचीविषगरळा । परमहळाहळेंपडतीविकळा । हळहळती
सकळवेल्हाळा । सर्वअबलातळमळती ३२ प्रलयकाळींचीविद्युल्लता । कडकडोनिपडेमाथा । तैसीझालीअवस्था ।
समस्तांततेकाळीं ३३ एकभूमीसींमस्तकआपाटिती । भडभडांअशुद्धवाहाती । एकस्वकरेंकेशतोडिती । धुळी
घालेआननीं ३४ एकचिवोढवलाअनर्थ । कोणकोणांसांवरीतेथ । ह्मणतीसर्वहीदैवहत । कांतेंत्यागिलेंह्मणोनी ३५
स्त्रियाउपस्त्रियांचेउभेथवे । जेविकमळांतूनिभ्रमरजाय । तैसेंचझालेंतयापाहे । विरहघायेंदुःखित ३६ ह्मणतीशिव
पूजेंतकांहींविक्षेप । ह्मणोनित्यागोनगेलानृप । जन्मांतरींमहत्पाप । यास्तवसकृपनव्हता ३७ धिग्लावण्यधिग् ॥४॥

१ सनत्कुमार सनक. सनंदन. सनातन. हे ब्रह्मदेवाचे चार पुत्र. २ रक्त. ३ जन्म.

यौवन । धिग्‌चातुर्यधिग्‌गायन । धिग्‌अळंकारधिग्‌भूषण । धिग्‌जननआमुचें ३८ येरयेरांचेगळांपडती । दीर्घस्वरेंरुदनकरिती । विरहेंविहाळल्यायुवती । मूर्छितपडतीपैंसैरा ३९ जेविमथुरेजायभगवान । गोपीहोती गतप्राण । आडव्यापडतीमूर्छेन । स्यंदनेवेष्टितीव्रजनारी १४० जेविमायामोहत्यागुन । देहांतूनानिघेप्राण । तेविकनककांताधिकारोन । निस्पृहनिघेगोपेंद्र ४१ पुन्हायेवोनिमातृदर्शन । घेऊनकरीसाष्टांगनमन । उभा राहेकरजोडोन । प्रार्थीतसेतेकाळीं ४२ तुझियेउत्तीर्णतेपाहे । कायाकुर्वंडीमाझीआहे । चिरकाळजिरंजीवकेला देह । तुवांमाझाजननिये ४३ ह्मणेजननीतवजठरींजनन । जन्मोनझालोंपरमधन्य । सद्गुरुमुखेंलाधलोंज्ञान । चिरंजीवमीझालों ४४ देईआज्ञाकरीनतीर्थ । हाचिमाझामनोगत । अनेकयोगीसिद्धमहंत । भेटतीलमज लागीं ४५ ऐसेयोगियापरिसेवचन । संपूर्णकरीतीर्थाटण । परीएकमागतेंतुजलागोन । भगिनीगृहींनवजाई ४६ आज्ञाजननीचीवंदून । विपत्यागीजेंविवमन । पुढेंकरिताझालागमन । सद्गुरुदर्शनध्यावया ४७ तोंसिंहा सनींजालंदरी । गोपेंद्रुसाष्टांगनमनकरी । आदेशआदेशयाउत्तरीं । जयजयकारीगाजला ४८ सप्तशतकानीफ शिष्य । इतरनृपकरितीदास्य । सर्वांसजालंदरीउपास्य । निरालस्यसेवेसीं ४९ श्रीगुरुजालंदरीसर्वज्ञा । ती र्थाटणादेईजेआज्ञा । सद्गुरुपायींनिश्चयप्रतिज्ञा । कदांअवज्ञानघडेची १५० मस्तकींठेविलावरदहस्त । तीर्थें करूनियेणेंसमस्त । वृत्तीठेवीनिमग्नस्वस्थ । येणेंपरमार्थसाधेल ५१ आज्ञामागोनिसत्वर । निघताझालायोगे श्वर । बोळवितीनारीनर । नगरजनसर्वही ५२ जेविअयोध्यात्यागून । वनाजायरघुनंदन । कींनैषधराज्य टाकून । गमनकरीकाननीं ५३ कींहरिश्चंद्रयुधिष्ठिर । अरण्यवासापांडुपुत्र । गेलेतेव्हांउदासनगर । दुःखदुस्तरप्रजेसी ५४ दुःखीप्रजाप्रळयाकांती । शोकसमुद्रींसर्वहीबुडती । रायासयेतीकाकुळती । आमुचीगती कायसी ५५ त्यागूनसर्वत्रांचीआशा । गोपेंदुरिघेअरण्यवासा । तोडूनमायांचाबद्धफांसा । मुक्तदशाअवरुं

१ रथ. २ तीर्थ यात्रा. ३ नलराजा.

बी ५६ देशदुर्गेंदुर्धरअरण्य । ग्रामनगरनद्यापट्टण । समग्रजायवोलांडून । स्वयेंएकांगएकटा ५७ फिरत फिरतमानसगती । अकस्मातदेखिलीभद्रावती । तेथेंभगिनीचंपावती । परमधार्मिकधर्ममती ५८ नगर प्रदेशींआरामस्थळीं । उभाठेलातयेकाळीं । पुसताझालातयेवेळीं । नगरजनातेंआवडी ५९ यानगराचें नामाभिधान । मजप्रतिकरावेंश्रवण । वदतीभद्रावतीचेंजाण । परमरमणीकअसेहें १६० ऐसेंअसतांअक स्मात । चंपावतीच्यासख्यासमस्त । जातअसतांविहारार्थ । तोंमार्गींयोगीदेखिला ६१ नूतनवयपरम सुंदर । सरळनासीकआकर्णनेत्र । भस्मचर्चीतसर्वगात्र । सुहास्यवक्त्रजयाचें ६२ दीर्घनूतनजटाभार । क मनीयरूपपरमनागर । प्रत्यक्षमदनाचाअवतार । तेथेंउपमाकायसी ६३ सुनीळमुद्रातळपतीश्रवणी । का षायमेखळाअरुणवर्णी । कुबडीकमंडलुदंडपाणी । सोहंस्मरणीरंगली ६४ पाहोनिपरतल्याराजसदनीं । ऐकेंचं पावतीश्रवणी । नगरप्रदेशींतीर्थाटणी । योगीएकदेखिला ६५ गुणरूपेंअतिसकुमार । जेविलावण्यवतीभ्रतार । धन्यजननीप्रसवलीकुमर । कोणकोठीलनकळेची ६६ येरीदचकलीमनीं । ह्मणेवार्त्ताऐकिलीकर्णी । कींगोपेंदुबंधू लागोनी । वैराग्यझालेंसांप्रत ६७ तोचिकिंवादुसराहोय । तुह्मीजाऊनयालवलाहे । पाहातांजाणवेलानिश्चय । भेटीकरवातयाची ६८ त्रैलोक्यचंद्राचापुत्र । त्रैलोक्यझालेंपवित्र । त्यागूनराज्यकुळगोत्र । जेणेंपरत्रं साधिलें ६९ तोमजदावावेंसाजणी । केव्हांपाहीनआपुलेनयनीं । तोवोळखीनराजचिन्हीं । येचक्षणीं जाणावा ७० सख्यासह्मणेजायेथुनी । तंवतोअकस्मातउभाअंगणीं । अलक्षगाजवोनिदीर्घध्वनी । उभा ठाकलापैंतेथें ७१ चंपावतीह्मणेयोगियास । कवणस्थानकवणदेश । कवणउपासनाकोणउपास्य । कोणव र्णतुमचा ७२ यावरीगोपेंदुवदेवचन । सहस्रदळआमुचेंनिजस्थान । देशआमुचानिरंजन । निर्गुणउपासना आमुची ७३ वर्णआमुचावर्णातीत । सर्ववर्णीओतप्रोत । तोहानिर्वाणनाथपंथ । अनाथासीनाथकरजो ७४

१ बाग. २ सुंदर. ३ कंबरपट्टा. ४ भगवी. ५ राज वाडा. ६ सत्वर. ७ मोक्ष. परलोक. ८ ब्रह्म.

कायानगरमगनगर्भी । तेथेंअनुहतवाद्यांचादुंदुभी । धगजफडकतीदैदीप्यनभीं । साम्राज्याधिकारीआह्मी
पैं ७५ यावरीवदेहंसगमनी । पूर्वाश्रमकोणतेस्थानीं । कोणजनककोणजननी । सत्वरोतरींवदावें ७६ आतां
पुससिजरींयथार्थ । गौडबंगालदेशाविख्यात । कांचनपुरीस्थळनेमस्त । त्रैलोक्यचंद्रपुत्रमी ७७ परि
सोनिगोपेंद्रूचेशब्द । भगिनीसझालेदुःखअगाध । ह्मणेतूर्तेवैराग्यपरमनिंद्य । खेदकरीसर्वदा ७८ अहाप्राक्तन
पाहाकैसें । कदानचुकेघडेआपैसें । राज्यत्यागूनअरण्यवास । सदानरेशभोगित ७९ जयाच्याद्वादशेंशतभार्या
सोळाशतत्याउपस्त्रिया । राज्यत्यागूनियांवायां । वैराग्यघेसीकिंमर्थ ८० तरींबंधुवर्यारहेंयेथें । चंदनमठबां
धितेंप्रशस्त । सुखेंराहेंतूंनिवांत । भोगभोगीसुखाचे ८१ कैंचायोगकैंचात्याग । कैंचेंघेसीतूंवैराग्य । भाग्य
सोडोनिअभाग्य । कांदौर्भाग्यभोगिसी ८२ यापरीपरिसोनउत्तर । निघताझालाअनिसत्वर । मगधांवूनिधरी
पदर । अंतरदेऊनिमजजासी ८२ बंधुरायाऐसेंनकरी । मजत्यागूनजासीदुरी । कोठेंपाहूंतुजलातरीं । माहेरयेथो
नितुटलें ८४ जेविधनुष्यापासोनिबाण । सुटोनिजायनलगताक्षण । हिंपुटीहोऊननीवदन । रुदनकरीआक्रो
शें ८५ सखियासांवरोनिधरितीबळें । परीतिचाशोकसमुद्रउचंबळे । हाहाशब्दींपडेविकळ । तळमळवाहे
अतरीं ८६ प्रधानकरितीशांतवन । गोपेंद्रूचेंधन्यसाधन । यावतचंद्रचंडकिरण । चिरंजीवचिकाळ ८७ आदि
नाथलीलासुधा । श्रवणमननव्हेबाधा । दुःखदरिद्रनासेआपदा । अंतींसत्पदापावती८८आदिनाथलीलाग्रंथ ।
भैरवसद्गुरूचावरदहस्त । तत्प्रसादेंआदिनाथ । एकविंशतिअध्यायवंदितो॥८९॥ओव्या ।१८९॥ अध्याय२१

१ बाराशें. २ कोणत्या. कारणास्तव. ३ दुःखी. ४ सूर्य.



॥१॥ श्रीगणेशायनमः । जोपरात्परआदिनाथ । जोसर्वांतरव्यातकूटस्थ । सबाह्यसघनओतप्रोत । परीअलिप्तस
र्वांसी १ जोस्थावरजंगमभरलासकळ । तयावीणरिक्तंनदिसेस्थळ । जोजगदाभासभासेसकळ । रिक्तअकुमाळ
नसेची २ जोपरंज्योतीपरमात्मा । जोअतर्क्यनिगमागमा । तयाचाकायवर्णूंमहिमा । मीएकमुखेंमतिमंद ३ ते
थेंजीवाशिवाचासंगम । तोयोगमार्गपरमदुर्गम । तोनाथगृहींहोयसुगम । स्वयंब्रह्मकरितीजे ४ गतकथाध्यायींक
थारंग । गोपेंदुकरीसर्वस्वत्याग । स्वयेंघेतअक्षयींयोग । भगिनीगृहातेंपातला५तीतेंनमानोनिवीतरागी । जा
ताझालातीर्थमार्गी । इकडेमैनावतीसवेगी । गुरुदर्शनातेंपातली ६ गुरुवदतीऐकजननी । गोपेंदुपुत्राराज्या
सनीं । विजयचंद्रातेंस्थापुनी । राज्यभारचालवी ७ यावरीकानीफनाथाप्रती । जालंदरीआज्ञापिती । सर्वे
आणिलेतुवांनृपती । तेस्वराज्यातेंपाठवी ८ अवश्यह्मणोनितयेवेळा । आज्ञादेतसकळभूपाळा । तुह्मीजाऊ
नस्वस्थळा । आपुलेंराज्यकरावें ९ गुरुरादींअसोंयावानिश्चय । येणेंतुह्मातेंसर्वत्रविजय । चिरकाळभोगूनऐ
श्वर्य । अंतींकैवल्यपावाल १० मैनावतीह्मणेसर्वज्ञमूर्ती । गोपेंदूच्यासमग्रयुवती । त्याअतिशयशोककरिती ।
तयांआत्मस्थितींलावावें ११दीनदयाळतेसमर्थी । शीघ्रपातलेभूपालयीं । तंवराजकांतासर्वही । सद्गुरुदर्शनापात
ल्या १२ औमानामेंपट्टराणी । मस्तकठेवीसद्गुरुचरणीं । सदुःखेंविलपतीकामिनी । हाहाःकारमाजला १३
राजभार्यावदतीवदनीं । गुरुवर्याहीविपरीतकरणी । आमुचामृगनिरंजनवनीं । दवडोनहरणीविघडल्या १४ पूर्व
प्रारब्धबळिष्ठ । यास्तवप्राप्तविरहकष्ट । कटकटांअदृष्टंबळिष्ठ । दुःखकष्टभोगवी १५औमेसह्मणतीतुझाप्रताप ।
तुवावश्यकरोनियांभूप । गुरुद्रोहाचेंमहत्पाप । घेईमापविरहाचें १६ राजमदेंतूंमदोन्मत्त । अविचारेंबोधिलानृ
पनाथ । त्याचेंहेंप्रायश्चित्त । आतांदुश्चितकांहोसी १७ जल्पोनिसकोपसंतापवाणी । सदुःखेंदुखितसर्वकामिनी॥ ॥१॥

---

१ रिकामें. २ कठीण.

तुवांकेलीनिंद्यकरणी । परीफळभोगणेंसर्वांतें १८ आमचाहंसिणीचाहंस । दीक्षादेऊनिपरमहंस । भेदीतगे
लाचिदाकाश । आमुचीनिराशाकरोनी १९ साळयासांडूनसम्यक । प्रपंचपिंजऱ्यांतूनिउडालाशुक । वैराग्य
वृक्षींबैसलादेख । आह्माशुकीतेंदेखुनी २० मनींघेऊनिविषयत्रास । सांगूनगेलासर्वत्रास । त्यागूनपुत्रमित्र
कलत्रास । कुळगोत्रासविटला २१ एकह्मणेजोडाविघडला । सारसमाझादैवेंतोडिला । कींचक्रवाकावियोग
झाला । शार्वरीनिशाप्राप्तपें २२ अहारायासौंदर्यसिंधू । तवनामविलसेतरींगोपेंदू । आह्माचातकादावीवद
नेंदू । पदतीर्थबिंदुइच्छितों २३ तुझ्याकुमुदिनीहोऊनिदीन । तूंआमुचारोहिणीरमण । तरीकांगेलासिआ
ह्मात्यागुन । वियोगअमावास्याआमुतें २४ तवप्रीतीचावोळलाघन । परीवैराग्यवातेंनेलाझडपोन । मयूर
रसआर्तऊर्ध्ववदन । करोनिराहिलीहिंपुटी २५ यापरीत्याराजकामिनी । विलापकरितीम्लानाननी । सद्गुरू
नेंऐकोनिश्रवणीं । पुसतेझालेतयांतें २६ तुमचाजोप्राणनाथ । तोतुमचेअसोनिहृदयस्थ । मगशोककरणेंकि
मर्थ । व्यर्थअनर्थभावितां २७ स्वदेहींपाहाशोधुन । तुमचेशरीरींवर्तेकोण । इंद्रियराहाटीज्यासत्तेन । पाहावो
ळखोनअंतरीं २८ तोनसेकोणाचाभ्रतार । तोनसेकन्याकलत्र । तोनसेकोणाचामित्रपुत्र । असेस्वतंत्रवेगळा
२९ जेविजीवनींभासेतरणी । परीतोअलिप्तसर्वांहुनी । घटींबिंबलादिसेजीवनीं । तोचिगगनींअलिप्त ३० जळो
पाधींदिसेचळला । परीतोठायींचसंचला । मृषामिथ्याभासभासला । तोसघनदाटलासबाह्य ३१ वस्तुतापाहा
तांएकभांगार । परीएकींअनेकअळंकार । कींअनेकमंदिरेंएकअंबर । कींसागरींतरंगज्यापरी ३२ तैसास्त्रीपुरु
षनामव्यक्ती । तेअव्यक्तपणेंजयाचीस्थिती । सर्वांतरींकरोनिवस्ती । परीनेणतीतयातें ३३ रांझणआणिघा
गरी । आकृतीविविधनामेंधरी । ओतप्रोतअभ्यंतरीं । परीनामरूपावेगळा ३४ घटमठींव्याप्तगगन । कींओंका
२८ रापासोनिसकळवर्ण । तेतुह्मीनेणोनिमहिमान । अज्ञानभ्रमेंकरोनी ३५ कींकंठींमुक्तकरोनिधारण । मगव्यर्थज
नाच्यागळांपडणें । तेंतुह्मासिझालेंज्ञान । जवळीअसोनिप्राणेश ३६ तुह्मांजवळीस्वतःसिद्ध । परीनेणतसांमति

 

मंद । मृगनाभीसीसुगंध । परीशोधीकाननपें ३७ तुमचाजोप्राणेश्वर । तुह्मांपासींचनिरंतर । त्यातेंविसरोनिबा
ह्यकर । शोधितांव्यभिचारस्वधर्मीं ३८ नेणोनिआत्मसुखाचीगोडी । तुह्मीरातिसुखास्तवझालांवेडीं । जोनेणो
निस्वानंदाचीप्रौढी । विषयआवडीवांछिता ३९ तरीतोक्षणिकविषयप्रसंग । परिपरिणामींदुःखअभंग । पतंगमातं
गकुरंगभृंग । मीनादिपंचप्राणहत ४० यापंचविषयेंकरोनी । महानपडिलेश्रेष्ठव्यसनीं । यापंचकाचीप्राणहानी ।
कितीह्मणोनिवदावी ४१ तरीविषयींहोऊनिनैराश्य । निर्गुणाचेंकरावेंउपास्य । तेणेंस्वस्वरूपींसामरस्य । द्वैत
भावमावळे ४२ तंवएकवदलीशुभलोचना । हेनृपवर्यादावीवदना । तुजवांचूनसदुःखितअंमना । एकटावनागेलासी
४३ आमुचेंहृदयवज्रापरी । विरहेंवांचलोंअद्यापिवरी । तंवदुजीवदेलावण्यलहरी । हेंदुःखदुस्तरींपडियेलों ४४
रवीतेंकमळेंअनेक । जेंविकमळातेंरवीएक । कींचंद्रातेंबहुचातक । तेविंनिशिनायकतूंमज ४५ तंवमैनावतीप्रार्थी
गुरुवर्या । ह्याविरहविव्हळराजभार्या । सक्तसुखऐश्वर्या । भ्रतारसौंदर्येंवेधल्या ४६ ह्याविषयसमुद्रींबुडाल्या ।
भवकर्दमींअतिगाढल्या । परमार्थासीनाडल्या । काढिल्यापाहिजेययांतें ४७ स्त्रियापतिसुखाच्याविरहिणी ।
वृत्तीगुंतलीविषयवासनीं । यांतेंसक्तपहोवोनी । मनोन्मनीलावावें ४८ नाथपंथाचासबळपक्ष । तरीउद्धरीउभय
पक्ष । तूंसर्वज्ञसर्वाध्यक्ष । अलक्षलक्षींलक्षवी ४९ जेविंगोकुळींगोपांगनें । उद्धवेंनिवेदिलेंनिर्वाणज्ञान । परीनमा
नीतयांचेंमन । श्रीकृष्णसगुणइच्छिती ५० तरीसक्तपहोऊनिअंतरीं । दीनोद्धारादीनउद्धरीं । अज्ञानतमनाश
कातमारी । प्रकाशकरीययांतें ५१ ब्रह्मैवभावहोययांसी । त्वंततपाववीअसिपदासी । तुमच्याह्यादासानुदासी ।
ह्मणोनिपायांसीलागल्या ५२ मगसिंहनादेंशृंगीवादन । तंवब्रह्मरंध्रगेलेंभेदुन । पावल्याझाल्याकैवल्यसदन । मनसं
लग्नहोऊनी ५३ जेविंमुरलीस्वरेंकरूनी । वेडावल्याव्रजकामिनी । देहगेहेभावविसरोनी । श्रीकृष्णींअनुसर
ल्या ५४ कींनागस्वरवाद्याचियेछंद । दंदशूकहोतीलुब्ध । तेविंराजस्त्रियांचींवृंद । ध्वनिनादेंवेधल्या ५५
झाल्यातटस्थराजयुवती । ब्रह्मीभूतझालीवृत्ती । पावोनियांआत्मस्थिती । स्वरूपीहोतीतटस्थ ५६ तेथेंदे

हभावानुरेठाव । हंससोहंस्वयमेव । जेथेंद्वैताचेंझालेंवाव । अहंभावंपैंगेला ५७ जेंविश्रुतिस्वरूपींसरती । कींइंद्रियेंतल्लीनकूटस्थीं । तेविनृपकामिनीप्रती । परमात्मज्योतीसाधली ५८ तेथेंकैचारावरंक । स्त्रीपुरुषकीं नपुंसक । ऐहिकदेहकैंचामायिक । आत्मत्वाससर्वदा ५९ एकमेवाद्वितीयंब्रह्म । सहजनासेहाभेदभ्रम । हेंचिअनु भवाचेंवर्म । हास्वधर्मयोगिया ६० जोनिरामयनिरंजन । परब्रह्मजेंपुरातन । ज्योतिर्मयमायाविहीन । योगी ध्यानध्यातीजें ६१ तेथेंध्येयध्याताआणिध्यास । मगकेंविउरलभेदभास । तोकोंदलास्वयंप्रकाश । अविनाश सुखींनिमग्न ६२ पाहासद्गुरूचीअघटितकरणी । नृपकामिनीचेमानममणी । ज्ञानोपदेशाच्यशवोविलेगुर्गी । सत्ता सूत्रीगुंतल्या ६३ नाथगृहींचाधन्यमहिमा । राजकामिनीकाष्ठप्रतिमा । विसरोनिभेदभ्रमा । परमात्मरूपींवे धल्या ६४ पाहागेयेणेंनवलकेलें । सबाह्यस्वरूपसमसंचलें । चित्स्वरूपचिद्घनदाटलें । डोळांदाविलेंप्रत्यक्ष ६५ जळोजळोहंसंसारजिण । जन्मोनिजननीक्लेशीण । नकरीश्रीगुरुआराधन । तरीयमबंधनचुकेना ६६ अनेक केलियाव्रततपदान । सिद्धीनव्हेसद्गुरुवांचुन । जेविदिव्यललनालावण्य । परीकुंकुमहीनव्यर्थपैं ६७ श्रीगुरुदे वाचाहीदेव । श्रीगुरुपरात्परपरतत्व । श्रीगुरुगुह्याचेंनिजगुह्य । श्रीगुरुउपायमोक्षासी ६८ आहाबाईपाहा कैसें । चोजदाविलेंमजआपैसें । विसरूनियांमीनूंपणास । त्रिपुटीग्रासकरविला ६९ आतांनकोराजवैभव । गौ रवतेंमानूंरौरव । प्रतिष्ठातेसूकरविष्ठाहोय । विषयविषसपावलों ७० संचितक्रियमाणप्रारब्ध । सद्गुरुप्रतापेंझा लींदग्ध । महिमावर्णितांशेषस्तब्ध । जिव्हाद्विभागजाहल्या ७१ कल्पतरुदेकल्पिलें । चिंतामणीदेचिंतिलें । कामधेनुदेइच्छिलें । निर्विकल्पकेलेंगुरूनें ७२ सद्गुरूसीउतराई । कायहोऊंसांगबाई ।तरीमौनेंचिपायींडोई । ठेवावीमजवाटतें ७३ जरीद्यावेंतनमनधन । तरीनैश्वर्यजायजाण । आतांगुरुदक्षिणातदर्पण । भावविश्वासदो घेही ७४ तोंवर्षाकाळप्राप्तझाला । पंचअनळप्रळयमाजला । पश्चिमेचामारुतसुटला।मेघमाळाकोसळती ७५ जळशशीमहीमंडळी । पारधीपातलागेलेनिराळीं । पिटीतमृगपाठींतेकाळीं । धांवेसैरानभातें ७६ शक्रेंचापधरो

निकरीं । रोहिणीमृगाचेपाठींनिकरी । मेघधारा अपारशरीं । घनसघनवृष्टीवर्षती ७७ सूर्यमयेंलपवीकिरण । गतआभानभातेंहोउन । लपावयाशोधीस्थान । जळदकुंथीआश्रय ७८ महिखंडशलाकाअभंग । अनेकपर्वत पिंडीशिवलिंग । शक्रअभिषेककरीसांग । अतिधारेसीनभपत्रीं ७९ वनस्पतीअष्टादशभार । पत्रींपुष्पींफळ संभार । इंद्रपूजीकर्पूरगौर । पर्वतपिंडीमहीवरी ८० मेघवीर्योदकेंस्रवती । होतपृथ्वीगर्भवती । अनेकसफळ धान्यप्रसवती । हरितवसननेसली ८१ नूतनतृणांकुरडवरले । चित्रविचित्रपट्टशोभले । अनेकरंगींरंगाथिले । बहुशोभलीकुंभिनी ८२ पंचाशतकोटीविस्तार । महीवेष्टितहरितवस्त्र । तेणेंशोभेअतिसुंदर । धरादेवीतेकाळीं ८३ कडकडाटचपळचपळा । मेघगडगडाटजाहला । संघाटगंगासमुद्रजळा । मिसळतीसैरासागरीं ८४ कपोतचातकमयूर । हर्षेंघोषकरितीदर्दुर । वृष्टीकरीमेघउदार । जीवनींजीववीजीवांतें ८५ मेघेंटवटवितीअं कुर । फळशाखाधान्यसमग्र । वनस्पतीसंपत्तीचेसंभार । धरावोपीजगातें ८६ विधिकरीसृष्टीउत्पन्न । विष्णू करीजगपाळण । तोचिस्वयेंहोयजलदजीवन । परोपकारीसर्वांतें ८७ प्रमाणकरोनिसूर्यचंद्र । आपणकरीकृतो पकार । तोविश्वईश्वरविश्वंभर । भरणपोषणकरीस्वयें ८८ ऐसावर्षाकाळप्राप्तजाहला । प्रार्थितेझालेसद्गुरूला । स्वानंदाचासुखसोहळा । सर्वहीइच्छितीसेवेचा ८९ चातुर्मासदीपानिरंजन । छत्रपादुकाकनकासन । श्रीगुरू सीअर्पण । भावेंकरोनिआवडीं ९० प्रातःकाळींउठोन । राजस्त्रियाभावेंकरून । गुरुमठींकरितसंमार्जन । केशरमृगमदसिंचिती ९१ मौक्तिकांच्यारांगोळ्या । चित्रविचित्रसुरेखरेखिल्या । त्याअतिसुरम्यशोभल्या । ठायींठायींसुंदर ९२ दीपदानेंविप्रभोजन । नाथआराधनेंनाथार्चन । द्विजांदेवोनिधनवसन । सद्भावमनेंकरि तार्ता ९३ जेंविचंदनाचेनिसंगें । तरुहोतीसुगंधअंगें । तेविंसद्गुरूचेंप्रसंगें । वैराग्यअनुरागसमस्तां ९४ नाथपराय णझाल्यावृत्ती । स्वरूपींसामावल्यास्थिती । स्वर्गसुखतुच्छमानिती । श्रीगुरुभक्तीसीविनटल्या ९५ तपेंयज्ञेंस्वर्ग प्राप्ती । शुद्धकर्मेंसत्यलोकस्थिती । शैववैष्णवसगुणभक्ती । कैलासवैकुंठप्राप्तपैं ९६ ब्रह्मउपासकगुरुसेवन

तरीत्याकैवल्यपदनिर्वाण । स्वस्वरूपींसमरसोन । भेदाभेदावेगळे ९७ तरीकर्मअर्पणश्रीगुरुचरणीं । वै राग्यशुद्धीअंतःकरणीं । चित्तशुद्धीयोगेंकरूनी । शांतिपावेनिर्धारें ९८ वैराग्यशांतीकरून । तत्काळहोय ब्रह्मज्ञान । ज्ञानेंकैवल्यसाधन । ब्रह्मसोपानसाध्यपैं ९९ तरीयाप्राप्तीसींकारण । मुख्यकरावेंगुरुसेवन । चं दनापरीशरीरझिजऊन । शीतळकरावेंगुरूतें १०० चंदनझिजोनिकरीशितळ । अगरुजळोनिदावीपरिम ळ । सुमनगुंफूनींन्हावेंमाळ । सुगंधकेवळगुरूसीं १०१ सद्गुरूचेंकरावयाअर्चन । पूजाद्रव्यमीचहोईन । सद्गुरूचेंजेंसिंहासन । स्वयेंहोईनसर्वांमीं १०२ मृदुमवाळआस्तरण । तेंमीहोईनमृदुआसन । सनम्रसंगेंमी चटेंकण । स्वशरीराचेंहोईनमी १०३ गुरुतांबूलपिकपात्र । तरीवोडवीनउभयकर । गुरुमस्तकींतन्मयछत्र । मीचविचित्रहोईन १०४ विरक्तीचेंहोईनचामर । वैराग्यव्यजनअहोरात्र । मीचहोईनशीतळसमीर । वायुवाह कमीचकीं ५ गुरुपदींच्यादृढपादुका । मीचनिजांगेंझालोंदेखा । गुरुपायांतळींचीमृत्तिका । पदरजअखंड मीहोय ६ गुरुकरितीआरोहण । तोमीहोईनदिव्यस्यंदन[1] । चहूंपुरुषार्थसुखासन । गुरुवैसवीनतयांत ७ मीच होईनहडपिकार[2] । उदकतांबूलदेईनस्वकर । बद्धहस्तसेवेसादर । मीचठाकेनपुढारी ८ मीचिहोईनवंदीजन । गुरुप्रतापकरीनवर्णन । मीचकरीनसुस्वरगायन । गुरुकीर्तनकरीनमी ९ मीचगुरुचरित्रपुराण । सद्गुरूवेंकर वीनश्रवण । मीचकरीनव्याख्यान । अर्थसांगेनगुरूसी १० चतुर्विधवाद्यकरून । मीचकरीनश्रीगुरुभजन । नृत्यगीततानमान । भावेंकरीनगुरुभक्ती ११ अर्घ्यपाद्यादिषोडशोपचारें । मंगळस्नानघालीनस्वकरें । शुद्धभा वांदिव्यांवरें[3] । धूपदीपादिनैवेद्य १२ फलतांबूलश्रीफळदक्षिणा । अर्पितसद्गुरुनाथचरणा । मगघालोनिप्रदक्षिणा । रत्नभूषणाअर्पित १३ सद्गदअष्टभावेंदाटुन । गुरुसींकरीसाष्टांगनमन । कायावाचाआणिमन । केलेंसांडगेंगुरुवरी १४चारीमुक्तींचातल्पक[4] । वरीपौढवीनगुरुनायका । गुरुसेवास्वहस्तकें । मस्तकेंपायघांसीन १५मीविसरलोंकथानु

१ रथ. २ सेवक. ३ वस्त्र. ४ शय्या.

संधान।लागलेंश्रीगुरुअनुसंधान। तदात्मकहोऊनमन। द्वैतभानहरपलें १६यास्तवनकोपावेंश्रोतीं।विनवीतसेपुढ
ती। तुह्मीक्षमाकरोनिमजप्रती। अभयोक्तीअसोतुमची १७ असोमैनावतीचेरचनीं। प्रबोधिल्यानृपकामिनी।
॥४॥ विषयींनैराश्यहोउनी। वैराग्यविरक्तींबाणल्या १८ यावरीसंशयश्रोतियांप्रती। कींजालंदरीचीनिस्पृहवृत्ती। अ
सोनिबोधिल्याराजयुवती। हंआश्चर्यआमुतें १९ तरीयोगियाचीप्रतिज्ञाऐसी। स्त्रियानपाहातीदृष्टीसी। मगउप
देशकायसातयांसीं। हंआश्चर्यआमुतें २० स्त्रियाहोतांदर्शन। तेंचियोगभ्रष्टासिकारण। स्त्रियांसीउपदेशिलेंज्ञान।
हंआश्चर्यआमुतें २१ जियेचेनेत्रकटाक्षईक्षणें। मनोजवेधींपंचबाणें। तरीदृढकेंविराहीलमन। हंआश्चर्यआमुतें
२२ याविषयींप्रत्युत्तर। प्रार्थीतसेजोडूनिकर। जयाचीवृत्तीतदाकार। तयासीविषयनबाधी २३ जयासीसमलो
ष्ठकांचन। स्त्रीभेटतांनवयौवन। जोमातृवतभावीमन। तयासीविषयनबाधी २४ जोरावरंकपाहेसमदृष्टीं। पिपी
लिकाआणिपरमेष्ठी। नसेजयाभेदपोटीं। तयासीविषयनबाधी २५ जेणेकामक्रोधाजाळिलें। लोभमोहातेंवाळि
लें। आशातृष्णातेंनिर्दाळिलें। तयासीविषयनबाधी २६ तयाभेदाभेदगळाला। तोअहंब्रह्मास्मिस्वयेंझाला।ते
थेंभेदभासकैंचाउरला। तयासिविषयनबाधी २७ ऐशाचिन्हींजोगुरुवर्य। तयासिस्त्रियाचेंकायसेंभय। जिहींके
लाविषयपराभव।, तेथेंसंशयकायसा २८ मागेंउपदेशिल्याबहुतयुवती। तरीत्यापरिसायथानिगुती। याज्ञव
ल्क्यानेंमैत्रेयीप्रती। उपनिषदयुक्तीबोलिली २९ तत्वनिष्ठतोदेवऋषी। उपदेशिलेंकयाधूसी। कपिलबोधीदे
वहूतीसी। परोक्षज्ञानठसावी ३० जोआदिनाथशूळपाणी। तेणेंउपदेशिलीतीमृडानी। यज्ञपत्न्याश्रीकृष्णेंबोधु
नी। मेळविल्यास्वस्वरूपीं ३१ उद्धवेंबोधिल्यात्यागोपिका। त्याब्रह्मरसाच्याकूपिका। कींस्वानंदाच्यापूर्णवा ॥४॥
पिका। ज्ञानकुंचिकालाधल्या ३२ सर्वधर्मांतधर्मश्रेष्ठ। गुरुभक्तीपरमउत्कृष्ट। गुरुपुत्रातेंपरमइष्ट। याहूनवरिष्ठ
नसेकीं ३३ इहामुत्रफळभोगधरोनिआशा। यज्ञयागादिकरितीहिंसा। पुण्यसरतांअतिदुर्दशा। जन्ममृत्युभोग

१ बायका. २ हात. ३ लोखंड व सोनें ४ मुंगी.

वी ३४ असोसत्काळसत्समागम । मैनावतीचीगुरुभक्तीनिःसीम । राजकामिनीचानोचिधर्म । सप्रेमप्रेमगुरुभ
क्ती ३५ वर्षाकाळचातुर्मास । सरतांकार्तिकाचाप्रवेश । व्रतउद्यापनेंबहुवस । राजभार्याकरिताती ३६ लक्षाव
धीविप्रभोजन । श्रीपादादिआराधन । तृप्तकेलेषड्दर्शन । सिद्धसाधूइतरही ३७ अन्नेंवसनेंअळंकार । देवांनि
तोषविलेधरामर । दीपनीराजनेंतींअपार । दानेंद्विजांदीधलीं ३८ श्रीमद्भागवतभारत । हरिवंशादिमाहात्म्यग्रं
थ । शिवपुराणेंचरित्रेंबहुत । समाप्तीकेलीकार्तिकीं ३९ लक्षबिल्वलक्षतंदुळ । लक्षपुष्पदीपसोज्वळ । सुलक्षल
क्षिलाजाम्बनीळ । सफळदक्षिणेंअर्चिला ४० राधादामोदरप्रीत्यर्थ । भावेंपूजिनीद्विजदंपत्य । सारोनियांनित्य
नैमित्य । परमार्थआर्तप्रीतीनें ४१ चातुर्मासत्संगसर्वकाळ । यापरीगेलाअतिरसाळ । स्वानंदसुमनसुखपरिमळ
रुंजीपरागज्यापरी ४२ यापरीगुरुसेवेंविनटल्या । जन्ममृत्युपाशोनिसुटल्या । सदास्वानंदींदाटल्या । त्याविट
ल्याविषयातें ४३ गुरुनामकल्याणकारक । गुरुनामभवच्छेदक । श्रीगुरुनामींकैवल्यसुख । त्वरिततारककलि
युगीं ४४ गुरूतेंजोनरमनींनमानवी । पतनपावेपडेरौरवीं । जोदेवाधिदेवगुरूतेंभावी । तयागौरवीहरिहर ४५
गुरुभक्ताचाअगाधमहिमा । तोनेणवेचिनिगमागमा । श्रीगुरुभक्तीचाप्रेमप्रेमा । स्वयेंसच्छिष्यजाणती ४६ धन्य
तेसद्गुरुसच्छिष्य । माहात्म्यवर्णितांशेषअशेष । जयावेस्मरणेंनिःशेष । निर्दोषयशपाविजे ४७ हाग्रंथपरमसुमं
गल । नासीदुरितेंअघअमंगल । जेविब्रह्मचिंतनींअकुमाळ । मनोमळनासती ४८ हासिद्धसिद्धांतसिंधुमथन ।
त्यांतीलसारांशचिद्रत्न । सद्गुरुमैरववरदयत्नें । मान्यहोयबुधजना ४९ जेविवटबीजअल्पसूक्ष्म । परीविस्ता
रदेतव्योमक्षेम । सघनछायाअतिसुगम । श्रांतविश्रांतश्रोतयां ५० मूळावांचोनिविस्तारकेला । प्रगटनोहे
चिपहासहसा । हाचिअसोंद्याभरंवसा । नोहेअन्यथाहेवागी ५१ मननराहेनिश्चळ । तरींयाग्रंथाचेंकायसेंफळ ।
दुर्वारमनपरमचपळ । तरीनेमशृंखळेंगोविजे ५२ श्रीआदिनाथलीलासुरस । रसिकजनहंसासुधारस । श्रवण
करोतआसमास । द्वाविंशतितमोध्यायगोडहा १५३ ॥ इत्यध्यायः ॥ २२ ॥ श्रीमत्आदिनाथार्पणमस्तु ॥

 श्रीगणेशायनमः । श्रीमतआदिनाथाजगन्मंगला । जगद्गुरुपयःफेनधवला । जगदोद्धाराजाश्वनीळो । जगजी
वनाजगदात्मया १ तूंपरब्रह्मपरात्परा । प्रणवरूपापरमेश्वरा । परंज्योतित्रितापहरा । पुराणपुरुषाविश्वाद्या
२ तूंचिचिन्मयचैतन्यघना । चिदाकाराचिद्रूपानिर्गुणा । चराचरचरिताचरितविहीना । अचळअढळानिरूप
मतूं ३ सिंहावलोकनावलोकन । गोरक्षकानीफमंवादवचन । अन्योन्यवचनेंज्ञानसंपन्न । तेंनिरूपणनिरोपिलें
४ गुरुदर्शनाचीधरोनिआर्त्त । गोरक्षपातलेदक्षिणपंथ । तेचिमार्गींअकस्मात । चर्पटीनाथभेटले ५ आदेश
ह्मणोनिकरीनमन । गोरक्षदेतीप्रतिवचन । आदिपुरुषींआदेशह्मणून । क्षेमालिंगनदेतसे ६ क्षेमकल्याणकुश
ळ । गोरक्षपुसतीतयेवेळ । नाथकृपेंकरोनिअढळ । चिरकाळोंनिमग्नचित्सुखें ७ कोठोनियेणेंकोठोनिगमन ।
चर्पटीविनवीकरजोडून । मत्स्येंद्रयोगेंउत्कंठमन । मल्लाळदेशींजातसों ८ नमनकरोनिउठाउठी । गमनकरी
तसेचर्पटी । इकडेगोरक्षसमुद्रनिकटीं । येतेझालेस्वइच्छें ९ लंकेसजातांरघुवीर । लिंगस्थापिलेंरामेश्वर ।
भोळानाथभवानीवर । जोस्मरहरत्रिपुरारी १० गोरक्षेंवंदिलेंचरणारविंद । अलक्षआदेशवदूनशब्द ।
जोआदिनाथसच्चिदानंद । प्रत्यक्षप्रगटपैंझाले ११ सप्रेमप्रेमेंआलिंगिलें । गोरक्षआननकुरवाळिलें । क्षेमक
ल्याणत्यापुसिलें । हृदयींधरिलेंआवडीं १२ वत्सास्नेहाळाभलाभला । नाथसांप्रदायदर्शनकेला । असंख्यबोधि
लेभूपाळा । दीक्षादेऊनिआपुली १३ जेराजमदेंमदोन्मत्त । ऐसेउपदेशिलेंत्वांनृपनाथ । त्यांचाचुकवूनजन्म
मृत्य । योगमार्गालाविलें १४ गोरक्षठेवितीमस्तकचरणीं । तोषोनिवरदेतपिनाकपाणी । अखंडराहेसोहंस्म
रणीं । योगतरणीतूंएक १५ आज्ञावंदोनानिघेशीघ्र । तंवसेतुबंधींवायुपुत्र । तयाचापरिसोनिभुभुःकार । जा
यसत्वरपैंतेथें १६ पाहूनियांपद्मासन । मारुतिकरीरामस्मरण । गोरक्षतयाअवलोकुन । कायवचनबोलत १७

१ शंकर. २ अधिभौतिक अधिदैविक अध्यात्मिक. ३ राजे. ४ शंकर. ५ योग रूपी सूर्य. ६ मारुति

गोरक्षह्मणेवातात्मजा । रामस्मरणींनिश्चयतुझा । परीतूंचिरामकींरामदुजा । मजनिवेदीकपींद्रा १८ तंवतोव
देअंजनीनंदन । पूर्णप्रतापीरघुनंदन । राक्षसांचेंकरोनिकंदन । रावणबाणेंमारिला १९ तोमहाराजदाशरथी
राम । श्यामसुंदरमेघश्याम । त्याचेपदींनिःसीमनेम । तोश्रीरामभजतोंमी २० तोश्रीरामघनसांवळा ।
किरीटकुंडलेंकटींमेखळा । कांसेकासिलापटपिवळा । डोळसस्कुमारसाजिरा २१ धीरवीरअचळठाण । विलसे
करींधनुष्यबाण । सरळनासिकनेत्राकर्ण । सुहास्यवदनजयाचें २२ वामांकींजानकीपवित्र । सेवेतिष्ठतीभरत
सौमित्र । शत्रुघ्नधरीसुवर्णछत्र । तोराजीवनेत्रश्रीराम २३ जेणेंनिवटिलेखरदूषण । तोरघुवीररविकुळभूषण ।
नामेंतारिलेजडपाषाण । सेतुबंधींअद्यापी २४ बंधमुक्तकेलेविबुध । प्रतापमार्तंडतोअगाध । तोचिरघुवीर
स्वतःसिद्ध । वेदवंद्यश्रीराम २५ जोमहाराजअयोध्याधीश । ध्यातीअहर्निशीत्रिदश । तेंचिमाझेंपरमउपा
स्य । निर्दोषयशजयाचें २६ जोपरब्रह्मअवतार । लीलाविग्रहीजानकीवर । तयास्मरणींअहोरात्र । सदापाषाणर
गोरक्षा २७ यावरीवदेप्रत्युत्तर । परिसेमारुतीसविस्तर । जेंपरब्रह्मनिरंतर । नसेआपपरतयातें २८ एकमे
वद्वितीयंनास्ती । ऐसीवदेवेदश्रुती । तयाह्मणतीसीतापती । हेंचिआश्चर्यवाटतें २९ जेंअव्यक्तवर्णरहित ।
जेंढवळेंसावळेंरंगरहित । जोनामरूपाहोयअतीत । नामरूपमगकैंचें ३० मुळींरूपचिजयानसे । तेथेंनामअसे
लतेंकैसें । अरूपातेंरूपनसे । तरीनामअसेकैसेंतेंसांगपां ३१ जेंनिर्द्वंद्वनिर्गुण । तरीतेंकैसामारिलारावण ।
उदकींतारिलेपाषाणा । तरीजळेंवरीपृथ्वीकीं ३२ ह्मणसीरामकींपरब्रह्म । तरीजानकीवियोगेंजेवनींभ्रम । वृक्ष
गुल्मामदेतक्षेम । नकळेवर्मकैसेंतें ३३ तूंनामरूपातेंविसरून । कैसेंकरिसीनामस्मरण । परात्परजेंनिर्गुण । तेंवर्ण
व्यक्तीनयेची ३४ पुन्हावदेवायुतनय । एकतत्त्वमस्यादिनिश्चय । अहंब्रह्मास्मिस्फुरणहोय । तेंविपाहेचिच्छक्तीं ३५
परब्रह्मतोरघुनंदन । इच्छाशक्तीतेजानकीजाण । उभयंपासावझालेंत्रिगुण । पंचतत्त्वींब्रह्मांड ३६ पंचवीसछातिसां
२९ चाउभारा । कारणहोयचराचरा । रामआडंबरपसारा । एकरघुवीरापासोनी ३७ अनंतब्रह्मांडांच्याश्रेणी । सत्तारूपें

१ हाव्यामाडीवर २ तेहतीस कोटी देव. ३ रात्रदिवस. ४ श्रीराम. ५ दगड. ६ पाणी. ७ उभयतांपासून. ८ जगास

ना.ली. बोविल्यागुर्णी । तोचिराघवचापपाणी । वेदपुराणींअतर्क्य ३८ मागुतीवदेमत्स्येंद्रसुत । पिंडब्रह्मांडहेंस्वप्न
॥२॥ वत । स्वस्वरूपींराहेनिवांत । स्वयेंरघुनाथहोउनी ३९ अभेदभक्तियोगेंकरून । स्वयेंचिरामहोईआपण । अ०
विसरोनियांमीतूंपण । सोहंशब्दींअसावें ४० सोहंरामहेंनिजगुज । हेंगुजाचेंहोनिजबीज । स्वानंदसुखाचेंसु
खभोज । सदाराहेकपिवरा ४१ वसिष्ठेंकथिलायोगवासिष्ठ । योगगर्भकथिलाउत्कृष्ट । रघुवीरानिवेदिलातोतूं ॥२३॥
स्पष्ट । स्वयेंजाणसीमारुती ४२ जाणूननेणताकैसाहोसी । विचारकरीनिजमानसीं । स्वयेंश्रीरामतूंचिहोसी ।
वृथाझकविसीमजप्रती ४३ मीनविहंगपिपीलिका । कपिमार्गतुझाकपिनायका । त्यातूंभोगिसीआत्मसुखा ।
मजसींशंकाकांधरिसी ४४ ऐकोनिगोरक्षमुखींचाबोल । परमसंतोपलाअंजनीचाबाळ । येतीस्वानंदसुखाचे
डोल । आंदोलवीपैंमस्तक ४५ सर्वांचिवदेहनुमान । मीआत्मत्वातेंविसरून । व्यर्थनाडलोंदेहाभिमान । मी
तूंपणद्वैताचें ४६ अनेकजन्मींचेसुकृतार्ती । तैंचभेटेश्रीगुरुमूर्ती । तेणेंप्राप्तआत्मस्थिती । निश्चयेंसीजाणिजे
४७ नामाचेगुरुअसतीबहुत । परित्यांदुरोनिकरावाप्रणिपात । रूपातेंमदनुग्रहव्यर्थ । ऐकरघुवीरनाथपैमाझा
४८ तेंश्रीराघवचरणारविंद । तेंचिसमाधिसुखस्वानंद । तेथेंमनोन्मनअभेद । भेदानुवादनसेपैं ४९ तोसद्गुरु
रविकुळभूषण । तेणेंनिवेदिलेंअध्यात्मज्ञान । तूंचिआह्मांमुख्यजाण । दुजेपणअसेना ५० कैचेंनामकैचेंरूप ।
अवघेंसंचलेंचिद्रूप । नामरूपाचासाक्षेप । व्यर्थकासयावाहासीतूं ५१ सावधहोऊनिपाहेचित्तीं । आत्मातूं
चिगानिश्चिती । महावाक्यबोधाचीप्रचीती । तदात्मवृत्तीअसोंदें ५२ महावाक्यसकळांसिआश्रय । श्रुतिह्मणे
आत्मातूंचिस्वयें । त्याचवचनींधरोनिनिश्चय । ब्रह्मादिकीटकव्याप्ततूं ५३ तोचितूंअसिपदींलीन । हेंतत्वम ॥२॥
स्यादिवचन । बुद्धिबोधूनिसीतारमण । निजपदींआपुल्या ५४ कर्मजेंनपवेप्रजेतेंवर्धन । त्यागपावेमहावाक्य
श्रवण । वर्मनेणूनिकरितीसाधन । वृथाशिणतयांतें ५५ जैंसद्गुरुकृपेचीसघनवृष्टी । तैंचलाभगाउठाउठी । मग

---

१ तर्ककरणेस कठीण. २ आपल्याचरूपीं. ३ मत्स्य. ४ पक्षी, ५ मुंगी. ६ श्रीराम.

सबाह्यआत्मदृष्टी । भाससर्वहीमावळे ५६ जगदाभासतोतूंचिजाण । याचासाक्षीदुजाकोण । दुजाकोणतुजवीण । सद्गुरुवचनहेंचिपैं ५७ मृन्मेयाचीकुंभघागरी । तेविविभागभावितीपुरुषनारी । जेविभ्रांतिकाकारणखरी । उपादानबहुविध ५८ वस्तुतांपाहातांएककनक । अळंकारींभासेअनेक । तेविजगदाकारमायिक । विस्तारिलें ज्यापरी ५९ सुवर्णाचाह्माळसारमण । आणिसुवर्णाचेंचिकेलेंश्वान । परीसुवर्णीनसेभिन्नपण । तोविअभिन्नजगदात्मा ६० बाळाबागुलभयाचीभीती । मुळींचनसेतरीकायसीखंती । कपीबळबुजणेंउभविती । तयाबुजतीवनचर ६१ कींरज्जूंउरगीभासेव्याळ । शुक्तिकेदिसेरजतबहळ । मृपामृगेंमृगजळ । अईनभ्रांतीभ्रमताती ६२ गुंजांचावैश्वानर । मानूनबैसतीवानर । तेविविषयसौख्यमानूनिनर । वृथापामरभुलती ६३ स्वप्नींदेखती सिंहव्याघ्र । गजराक्षससर्पभयंकर । पाठीलागतीएकसर । होतांजागृतीमगकैंची ६४ रावस्वप्नीहोयरंकें । ग्रामींफिरेनमागेभीक । स्वप्नभ्रमेंपावेदुःख । जागृतीनिष्टंकनृपस्वयें ६५ तैसातूंचिआत्मास्वयमेव । परीमीजीवभाविसीस्वय । तूंचिव्याप्तअंतर्बाह्य । व्यर्थभ्रमेंनाडसी ६६ जिव्हामुखींअसेकींनसे । ऐसेंबोलतांयेतसे हंसें । जिव्हेवीणबोलसीकैसें । मूर्खतायेतबोलतां ६७ तूंआपुलेंसत्यदेखसी । आपुलेसत्तेंएकसी । आपुलेंसत्तेंविचरसी । परीतूंनेणसीआपणा ६८ तूंस्वशरीरातेंव्याप्तहोसी । रोमरोमातेंहीजाणसी । परीमीकोणहेंनजाणसी । विसरलासीपैंकैसा ६९ त्रिविधतापेंजेपोळले । कामक्रोधेंअहळले । तेविषयसुखासगुंडाळले । तेचनाडलेपरमार्था ७० कांहींनकेलेंसाधन । दुराशेनेंइच्छितधन । पुत्रकलत्रप्रपंचसेदन । गुंतोनिव्यर्थराहिले ७१ जेविभ्रमलेपणेंबुद्धी । विसरोनियांस्वात्मशुद्धी । मीचिनव्हेह्मणेत्रिशुद्धी । भ्रमोपाधीकरोनी ७२ कींशुकाचेनिअंगबळ । नळिकायंत्रींअधोमौळ । होऊनिहोतसेव्याकुळ । भ्रमेंकेवळपावत ७३ अट्टहासेंशब्दकरी । परीउडावेंहेंनयेअंतरीं । मीबांधलोंनिर्द्धारी । ह्मणोनिअव्हेरीधैर्यातें ७४ त्यादेहलोभाचेपदींशृंखळा ।

१ मातीची. २ पुरुष स्त्री. ३ मातीं. ४ सुवर्ण. ५ कुत्रें. ६ दोरी. ७ सर्प. ८ शिंप. ९ अग्नी. १० मरीच. ११ घर. १२ मोठ्यानें.

मींदृढबांधलोंनसेमोकळा । संशयाचाखोडापडिला । तेणेंनाडलेबहुतची ७५ तैसाहामुक्तचिअसे । परी०यर्थ बद्धमानीतसे । अज्ञानाचेंभारिलेंपिसें । तेणेंनाशसर्वस्वा ७६ जैसद्गुरुकृपेचावरदहस्त । तैंचब्रह्मींचेंसाम्राज्य समस्त । पावूनस्वानंदभोगित । द्वैतंवार्ताअसेना ७७ कार्याचीस्थितीकारणीं । जेविंगारांभासतीजीवनीं । सर्वचिलीनतयेक्षणीं । भासजायविसरोनियां ७८ जेविंकाश्मीराचेनिकेतनीं । उदयउदेलेअसंख्यतरणी । तेविं आत्मप्रभेचीउघडलीखाणी । सद्गुरुनयनींचोजवी ७९ अंतर्बाह्यभरोनपूर्ण । मगउरेसाक्षित्वेंकरून । सदास्वानं दींनिमग्न । वृत्तिनिवृत्तीहोउनी ८० अनेकनद्यांचेप्रवाह । सिंधुमिळणींसिंधूचिहोय । तैसाप्रत्यक्आत्मास बाह्य । निजात्मवृत्तींवर्तत ८१ नसेकर्ताकार्यकारण । पृथिवींचरतांनिस्त्रैगुण्य । मगविधिनिषेधाचेंकारण । सर्वथाजाणअसेना ८२ मगउर्वरीतदेहप्रारब्ध । जेविंपटघडीवस्त्रदग्ध । तोजीवन्मुक्तस्वतःसिद्ध । निंद्यंद्या नातळे ८३ एकस्वजारविहारकामिनी । सुरतश्लेष्माप्रियमानी । उभयचेतकचेप्रकएकपणी । अन्योन्यमुखें एकपै ८४ तोसाक्षित्वत्रिगुणासीजाणत । तोचिद्रष्टाअवस्थात्रयातीत । तोतुर्याचादेखूनप्रांत । त्याप्रियप्रत्ययउ न्मनी ८५ तत्वाचेंतत्वतेंचिकारण । त्यामहतत्वाश्रयेंकरून । कांतूंतेनजाणसीखुण । असोनियांतोचितूं । ८६ अविद्येचीनिशापडली । तरीचचक्रवाकेंविघडलीं । ज्ञानोदयकपाटेंउघडलीं । तेणेंजोडलेसत्सुखा ८७ जेविंअग्निस्फुलिंगेंकरून । दग्धहोयतमतॄण । कींमित्थ्योदकींबिंदुपतन । द्वैतंपणमगकोठें ८८ पृथ्वीसीं प्रमाणसूर्यकिरण । कींआकाशघटमठींव्याप्तपूर्ण । कींतंतुपटाचीजाणेखूण । तेविंरघुनंदनमीस्वयें ८९ तरीआजिउदेलाधन्यदिवस । मजभेटलानाथपुरुष । स्वानंदसुखाचाउत्कर्ष । तुझेनिझालोंगोरक्षा ९० तूंना थपंथाचाकुलावतंस । तूंस्वस्वरूपींसदासमरस । त्यागूनियांआशापाश । गोइंद्रियांसंरक्षिलें ९१ यावरीगोरक्ष वदर्ताशब्द । कासयाबोलसीहाउपरोध । ऐक्यमिळणींहाअनुवाद । मगमहजखुंटला ९२ जीवींजीवाचेंऐक्यसंधी



१ वेड. २ भेद. ३ पाण्यामध्ये. ४ सूर्य. ५ रात्र. ६ तमरूपी गवत. ७ निराळेपणा.

तेचि आत्मन्वींदृढसमाधी । जेविशर्करासमरसदुग्धीं । अभिनवगोडीपैं जैसी ९३ तेविंगोरक्ष आणिमारुती । उभय
संगमींविशेषप्रीती । कींगंगायमुनासरस्वती । तीर्थराजप्रयागहा ९४ मगह्मणेलंकादहन । मोरक्षा असावें अनुदि
न । सत्समागमइच्छीतमन । तुजवीण आन असेना ९५ लवनिमिषकिंवापळ । सत्संगतीनेंजातांवेळ । सत्समा
गमाचें अगाधफळ । कितीह्मणोनिसांगावें ९६ मजनामरूपींजडलीप्रीती । आंगींबाणलीआत्मस्थिती । स्वदे
हींवोळखिलारघुपती । मीतूंभ्रांतीउडाली ९७ होतांस्वात्मानुभवीं अनुमान । तोप्रत्यक्षप्रगटेपरिच्छिन्न । रघु
वीरकृपेंसम्यक्ज्ञान । सोहंरामींवोळखी ९८ जेविकीटकभृंगन्याय । अभ्यासेंतेहीहोतीस्वयें । तेविझालेंमजपा
हें । स्वात्मसुखजोडलें ९९ मगह्मणेमत्स्येंद्रसुत । तूंहोसीसर्वज्ञसमर्थ । तुझेनिदर्शनेंमनोरथ । पूर्णझालेहरिवि
रा १०० महानतत्ववेत्तातूंमारुती । कृष्णमुखींचीगीताउक्ती । श्रवणकेलीयथानिगुती । तूंब्रह्मनिष्ठब्रह्मांडीं १
तरीयेचविषयींइतिहास । श्रोतींपरिसावासारांश । युद्धझालेंअष्टादश । दिवसपर्यंतभारती २ विजयध्वजींवि
जयध्वज । विजयसाह्यार्थवातात्मज । तंवधनंजयातेंगीतागुज । गरुडध्वजस्वयेंबोधी ३ हरिवरध्वजकींकरीश्रु
त । तेथंतोस्वयेंश्रवणकरीत । एवंकृष्णार्जुनहनुमंत । जाणतीगुह्यार्थगीतेचा ४ असोयुद्धाचीहोऊनसमाप्ती ।
मारुतिगेलास्वस्थळाप्रती । नमस्कारोनिअंजनीसती । बद्धहस्तींतिष्ठत ५ जननीवदेलंकादहना । तूंसेभक
ल्याणकींनंदना । कोठेंगेलासिकवणकारणा । कळवीमजसाद्यंत ६ ह्मणेकुरुक्षेत्रींकौरवभार । आणिसमुच्चयींपंडु
पुत्र । मजसाह्यार्थंसाचार । सुभद्रावरनेतसे ७ पुन्हावदेअंजनीजननी । युद्धकैसेंझालेंसमरंगणीं । रामरावण
लंकेलागुनी । कींदेवदानवदेवींचें ८ तदोत्तरवदेहनुमानें । मीसर्वथाकांहींवनेणें । मीगीतार्थकेलाश्रवण । समा
धिस्थपैंहोतों ९ माताह्मणेरेत्रिशुद्धी । साह्यार्थगेलासजयाचेयुद्धीं । युद्धींकेविलागेसमाधी । हेंआश्चर्यमजवाटे
१० मारुतिह्मणेतेंनिजगुह्य । तुजनिवेदितोंआजपाहे । युद्धींश्रीकृष्णधनंजय । गीतासंवादपैंकेला ११ मीआ

१ श्रीराम. २ वचन. ३ मारुति. ४ अर्जुन. ५ श्रीकृष्ण. ६ मारुति. ७ अर्जुन.

णिअर्जुनचक्रपाणी । चवथारथींनसेकोणी । त्याब्रह्मरसाचीसिसणी । अवचटसुखदुर्लभ १२ जेंदेवकीवसुदेवातेंचोरि
लें । जेंनंदयशोदेसिंहीझकविलें । जेंबळिभद्रातेंचुकविलें । तेंसाधलेंअर्जुना १३ शेषइंदिरासन्निधानिकटीं । परी
त्यांसिहीनवदेगुह्यगोष्टी । तोधन्यधन्यधनंजयकिरिटी । स्वात्मसुखलाधला १४ ऐकोनमातादेतउतर । तरी
पुत्राहाकेविजगदोद्धार । पुढेंकलीहादुर्धर । त्यांततरणोपायकोणता १५ यावरीबोलेप्लवंगोत्तम । परिसींजन
नीभविष्यनेम । अंशावतारीहोतीपरम । हरिहरस्वयेंअवतरती १६ । श्लोक । भविष्यतिसएवाग्रेशैवःशंकरविग्र
हः । ततोहरेरंशभूतोज्ञानदेवोमहायशाः । आचार्याधिकतामेतन्गीर्वाण्यानवदेत्स्वयम् । वेदज्ञःसर्वशास्त्रज्ञःसर्व
ज्ञोपिमहायशाः । २ टीका । पुढेंहोतीलअवतार । स्वधर्मस्थापकविग्रहशंकर । तेटीकाकरितीगीतेवर । पर
मगूढगीर्वाण १७ ह्मणोनजगदोद्धारास्तव । विष्णुहोईलज्ञानदेव । गीर्वाणनवदेस्वयमेव । जोवेदवदवीपशुहातीं
१८ गीतेवरीकरितीटीका । तेज्ञानदेवीलौकिकींआख्या । छप्पन्नभाषेचींसुवेलिका । पत्रींपुष्पींसफळित १९
तेमुमुक्षुपक्षाचीफळदायिनी । जेमोक्षपदाचीआदिजननी । जेसकळश्रेयाचीस्वामिणी । जेकामदुघाआर्तांची
२० जेसकामाचीकामेश्वरी । जेयोगसिद्धीचीयोगेश्वरी । जेजगज्ज्ञानेश्वरी । जेईश्वरीचित्कळा २१ इतरटीका
गीतेवरी । परीतेज्ञानेश्वरीचीनेणवेसरी । कींश्वापदांमाजीकेसरी । वरोवरीनपावती २२ गीताश्लोककिंवापद ।
व्यासोक्तगीतामाहात्म्यअगाध । महिमावर्णिलाविविध । जोपरमवंद्यत्रिभुवनी २३ गंगागीताह्मणतसिमान ।
परिवेगळेंमाहिमान । तरीप्रत्यक्षाकासयाप्रमाण । पदमुखऐक्यकेवी २४ मुखापासावझालीगीता । पादापासा
वगंगापाहातां । याउभयांसीसाम्यता । केवियेईलसांगपां २५ एवंगीतासर्वांतश्रेष्ठ । भावभावार्थेकरितां
पाठ । अंतीप्राप्तत्यावैकुंठ । स्वयेंविष्णुहोयतो २६ आदिनाथलीलाग्रंथीं । जोविजयरथींस्थिरसारथी ।
तोचिबैसोनिहेमनोरथीं । ग्रंथार्थीसाह्यपैं २७ आदिनाथलीलासुरससबाह्य । नवरससुखाचेंसुखालय । श्रवणा

१ श्रीकृष्ण. २ मिळणेम कठिण. ३ बरोबरी.

भिप्रायतोषवी २८ तेविसावाअध्यायउपेंद्र । भद्रकारकसदासुभद्र । अघसंहारप्रतापरुद्र । कींवीरभद्रपैंदुजा २९ आदिनाथलीलाग्रंथअद्वय । भैरवसद्गुरूचावरदविजय । तत्पदींठेवूनिनिश्चय । आदिनाथवंदितसों ३० श्रीमत्‌आदिनाथलीलाग्रंथ । श्रवणेंपुरतीमनोरथ । यातेविसांव्यातपरमपरमार्थ । प्राप्तहोयसर्वदा ॥ १३१ ॥ इत्यध्यायः ॥ २३ ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ श्रीमत्‌आदिनाथार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ ओव्या ॥ १३१ ॥



## अध्याय २४ वा.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ जोआदिनाथनिरामय । पूर्णब्रह्मजोअद्वय । जयाध्यातीदेवत्रय । शिवविष्णुविरंची १ जयास्तवितीश्रुतिस्मृती । त्याहीपारजेथेंनपवती । सहस्रशीर्षाच्याशिणल्यामती । तेथेंमीकितीमतिमंद २ गतकथाध्यायींचाइतिहास । गोरक्षमारुतिसंवादसुरस । ब्रह्मनिरूपणपरमरहस्य । निवेदिलेंपैंश्रोतयां ३ हनुमंताचीआज्ञावंदून । तेथूननिघेमत्स्येंद्रनंदन । मल्लाळदेशातेंलक्षुन । स्त्रीराज्यांतपातले ४ पूर्वकथेचें अनुसंधान । अगस्तिदिशेमत्स्येंद्रगमन । अकस्मातस्वलीलेंकरून । येतेझालेसद्गुरू ५ पुष्पवाटिकेउपवनीं ।

---

१ ब्रह्मदेव. २ सहस्र मुखांचा शेष. ३ मारुति.

राहातेझालेमोक्षदानी । तेथेंआरामरक्षककामिनी । शस्त्रपाणीअसती ६ तयांपुमतीमत्स्येंद्रनाथ । येथेंकोण
नृपराज्यकरित । येरीवदतीकरविश्रुत । सायंतवृत्तसांगती ७ पार्वतीवरदैंयादेशीं । पद्मिणीनिपजतीलावण्य
राशी । तयांदेखूनस्मरमानसीं । सलज्जहोऊनिविस्मित ८ ज्याचातुर्यविशारदशारदा । विद्युल्लतेसमचपळप्र
मदा । नवयौवननवोढामुग्धा । सुरतसुरसायोग्यपैं ९ शंकरनिगूढनिवासस्थळ । हेंअंतःपुरनिवासराउळ ।
एथेंभवानीजाश्वनीळ । क्रीडाकरितीअक्षयी १० येथेंआधिपत्यनृपपारिमळ । जिचावपुसुगंधपरिमळ ।निर्ज
रहोऊनिअळिकुळें । सुरसुरतइच्छिती ११ शिवशापेंअद्यापिवर । तशांतमारुतीचाभुभुःकार । पुरुषगर्भ
किंतानंर । कदांनराहेपैंयेथें १२ जेविनक्षत्रींनक्षत्रनाथ । तेविपरिमळपर्वस्त्रियांत । सुवासमुगंधयोजनपर्यंत ।
वातेंयोगेंकरूनी १३ तप्तसुवर्णवर्णशरीर । नासिकदेखोनिलज्जीतकीर । उड्डाणकरितीएकसर । तृक्षावरीस
लज्ज १४ अधरपुटेंअरुणरंगी । वरीबिंबफळसांडणत्यागी । चंडनेत्रदेखूनकुरंगी । लंघितातोदशदिशा १५
चपळाक्षदेखोनिमीन । उदकींराहिलेलपोन । सरळपोठरियाविराजमान । गजसलज्जशुंडीचाली १६ अलक
सलंबनिरखूनिवेणी । बिळींवारुळींलपतीफणी । सिंहकटीनिरखोनझणी । परीतोहीलंघीकानन १७ जेशृंगार
सरोवरमराळिका । मृदुमवाळलावण्यलतिका । जीचेपाहूनवदनशशांका । शशांकशंकाभारीमनीं १८ गमनदे
खूननिरंतर । मराळकरितीदिगंतर । मुखनदावितीअद्यापिवर । परमसलज्जकलियुगीं १९ जिकडेपडेदंत
पंक्ती । पाषाणपद्मरागस्वयेंहोती । पदमुद्राजेथेंउमटती । पद्मेंप्रगटतीतेस्थळीं २० पंचमसुस्वरगाय
न । ऐकोनिकोकिळाधरितीमौन । चक्रवाकपरीपीनस्तन । वियोमपर्णेसदुःखी २१ रंभास्तंभवतपोटरिया
जाण । रंभोरुगौरानितंबसघन । कटीवेष्टीतरत्नभूषण । अनर्घ्यप्रभास्फुटकली २२ वंशोद्भवमुक्तेंउत्पन्न ।
दुजीगिरिमौळापासून । मत्तमातंगमस्तकांतून । शुक्तिकेचींपैंचौथीं २३ सर्पमस्तकींचेमणी । जैसेउदे



१ स्त्रिया. २ भ्रमर. ३ पुरुष. ४ चंद्र. ५ वायु. ६ सुवर्णा सारखे तेजःपुंज. ७ पोपट

लेप्रभाततरणी । वैरागरींचेंसतेजमणी । एकवळीसपंक्त २४ गरुडपाचूइंद्रनीळ । आरक्तमाणिकेंसुढाळ । सुतेजकंकणेंकरयुगुळ । अत्यद्भुतडवरले २५ मुक्ताघोषतळपतीश्रवणीं । कातिकापुंजशुभ्रवर्णीं । कर्णसुमनें चंद्रकिरणी । विकासलीसुरम्य २६ ऐसीसर्वस्त्रियांतस्वामिणी । परमरूपसौदामिनी । जीतेंदेखूनिनागिणी । तिष्ठतीपाताळभुवनींअद्यापी २७ जीचीप्रियसखीचंद्रकळा । जीचेंसौंदर्यपाहोनडोळा । क्षयरोगचंद्रासिला गला । हीनकळाक्षयवृद्धी २८ सुलक्षणसर्वकाळींजाण । चातुर्यविशारदअतिप्रवीण । तेयुवराज्यासपरमनिपुण न्यायअन्यायजाणती २९ यापरीसुकेशीचेंउत्तर । परिसोनिसंतोषलेश्रीमत्स्येंद्र । अतिहोऊनहर्षनिर्भर । लाभचिह्नसुचविती ३० नमनकरोनिकरीगमन । वारंवारनिरखीआनन । मनींह्मणेहेंएकांतकानन । मनोजमनींस्फुरेपैं ३१ तंवशीघ्रनिघोनसुकेशी । पातलीत्वरेंराजसभेसी । सभेबैसलीलावण्यराशी । सिंहासनींपरिमळा ३२ कामिनीवृंदआसमंत । छत्रचामरेंविराजित । नृत्यांगनेचेंहोतनृत्य । शस्त्रास्त्रींस्त्रियातिष्ठती ३३ जेविपक्षासनींमृडानी । सिद्धीतिष्ठतीबद्धपाणी । तेविदिसेपरिमळाराणी । सभामध्यींशोभली ३४ निकटबैसलीचंद्रकळा । जेविसरस्वतीचतेअबळा । चतुर्दशविद्याचौसष्टीकळा । विसावल्यापैंतेथें ३५ इकडेपरिमळेतेंसुचिन्हें । वामनेत्रबाहुस्फुरण । कंचुकीचेंविरडेंजाण । मुक्तहोयक्षणक्षणीं ३६ सुकेशीमुखींलावूनिवक्त्र । सांगतीझालीगुह्यमंत्र । आपुलेउपवनींआकर्णनेत्र । पुरुषदैदीप्यदेखिला ३७ निर्जरकिन्नरपंक्ती । अमरप्रतिमानयेव्यक्ती । धांडोळितांसर्वजगती । दुजीमूर्तीदिसेना ३८ इंद्रचंद्रभास्कर । ब्रह्माविष्णुर्मीशंकर । मदनकुरवंडीकरावात्वरें । परीऐसानरनदेखूं ३९ मगपरिमळातीतेंवदत । मजपूर्वीनारदेंकेलेंश्रुत । तुझियेसदनींअकस्मात । मत्स्येंद्रनाथप्रगटती ४० त्यावचनींधरोनिविश्वास । मार्गलक्षीरात्रदिवस । सर्वदासदानिजध्यास । चातकासज्यापरी
३० ४१ भुभुःकाराचेभयेंकरून । दुजापुरुषयेईलकोण । त्यांतदेवऋषीचेंवचनस्मरोन । मार्गलक्षीतयाचा ४२

---

१ मोत्यें. २ पांढरें. ३ विजेप्रमाणें. ४ अरण्य. ५ पुरुष. ६ नारदऋषि.

जेविसुदेवाचेआगमनीं । परमहर्षपावेरुक्मिणी । कींहंसनळनिरूपणीं । आनंदहोयदमयंती ४३ तिचेगळां
घालोनमिठी । वारंवारथापटीपृष्ठी । ह्मणेंआतांचलाउठाउठी । पाहीनदृष्टींतयातें ४४ सर्वेंघेऊनसेनासंपत्ती ।
जातीजाहलीवनाप्रती । सर्वेंप्रियसख्यापरमप्रीती । येतीजाहलीपैंतेथें ४५ वीरवेषेंशूरचिन्हीं । खड्गेंवोडणीधृत
धारिणी । परशतोमरपट्टीशपाणी । अश्विनीपद्मिणीआरूढल्या ४६ गजस्कंधींबैसल्याअंगना । अंकुशेंआकर्षि
तीमत्तवारणा । सुशोभ्यसुलोचना । वीरगुंठीबांधिल्या ४७ गजस्कंधींगजगामिनी । ध्वजडवरलेसुवर्णवर्णी ।
चामरेंशोभलींउभयश्रवणीं । रत्नकोंदणींपाखर४८दंतीजडलींअनर्घ्यरत्न । लघुकिंकिणीहेमभूषण । घंटास्वशब्दें
करून । मत्तमातंगडुल्लती ४९ रम्यरमणीकआराम । वृक्षदेतीगगनींक्षेम । तडागतुडंबिलामनोरम । तटींसेना
ठेविली ५० त्यागोनियांसहपरिवार । सुकेशीचाधरोनिकर । मत्स्येंद्रदर्शनापादचार । येतीझालीशुभांगी ५१
देखोनियांसिंधुमार्ग । मंदाकिनीचाजायवोघ । तैसीएकटीनिःसंग । गमनकरीतन्वंगी ५२ वनश्रीपाहोनिनिवां
त । वृक्षनिबिडसघनबहुत । तळींबैसलेमत्स्येंद्रनाथ । अकस्मातदेखिले ५३ जेविपायाळुयातेंअंजन । भेटतां
प्रत्यक्षजोडेधन । तेविहर्षनिर्भरमन । होतेंझालेंतियेचें ५४ नाथाकरूननमन । उभीराहिलीकरजोडुन । पुसती
झालीवर्तमान । प्रार्थूनियांवदतसे ५५ कोठोनियेणेंकोठूनिगमन । नामगोत्रकरवावेंश्रवण । कोणदेशकोणवर्ण ।
सकृपहोऊनिसांगिजे ५६ यावरीमत्स्येंद्रवदतीशब्द । ब्रह्मापासूनिदृश्यबुद्बुद । अनामियानामअशब्द । प्रणव
प्रसिद्धमात्रपैं ५७ देशआमुचानिरंजन । वर्णातीतवर्णविहीन । किमर्थआह्मांकरिसीप्रश्न । कारणकांहींकळेना ५८
तरीवचनऐकानेमस्त । अनामियानामकूटस्थ । आभासीआकाशकिमर्थ । कासयाह्मगतीसर्वज्ञ ५९ अनंगही
अंगहीन । तरीनामधरितोहीमदन । रूपहीनअसतांपवन । नामधारणकरीकीं ६० जयानेंधरिलाविग्रह । तया
सींचवदतीदेह । तेथेंनाममनिःसंदेह । त्रिवाचेसीजागिजे ६१ मीचरणसेवाइच्छीतसें । करावानामंमंत्रउपदेश ।



---

१ लहान घागऱ्या. २ आलिंगन.

तेणेंइहपरत्रास । सुखभोगीनअक्षयी ६२ अन्योन्यऐक्यझालेंमन । उभयपक्षींसमान । परीबाह्याकारसंपादुन । मत्स्येंद्रवदतीतियेतें ६३ कवेंनामकैंचेंरूप । अवघेंसंचलेंचिद्रूप । नामरूपाचासाक्षेप । व्यर्थजाणपैंतुझा ६४ स्वरूपसौंदर्यदेखून । परिमळोझालीतल्लीन । चित्तींदृढनिश्चयेंकरून । गळांमाळघातली ६५ पादस्पर्शोंनियां मौळ । जेविदमयंतीनेंवरिलानळ । त्यागूननिर्जरभूपाळ । निश्चयनैषधींपैंजीचा ६६ नृपऋषींतेंसांडुन । जानकीवरीरघुनंदन । कींयाज्ञसेनीअर्जुन । नेमनेमिलाविधीनें ६७ कींहिमनगकन्यापार्वती । तीमाळघालीपशुपती । कींरमावरीविष्णूप्रती । परमप्रीतीकरोन ६८ जेविपयआणिजीवन । एकहंसचिनिवडूंजाण । तेविनरनिर्जरत्यागुन । एकमत्स्येंद्रअनुसरली ६९ समारंभेंप्रमेनगरीं । मत्स्येंद्रआणिलेतेअवसरीं । गुढियातोरणेंघरोघरीं । शृंगारिलीपुरीते ७० मंगळवाद्यमंगळतुरीं । प्रतिशब्दनमायेअंबरीं । उभ्याठेल्यानगरनारी । सुदीपकरींघेवोनी ७१ केशरकस्तुरीचेसडे । रंगमाळाचहूंकडे । स्त्रियांचेंवृंदमागेंपुढें । वाडेंकोडेंचालती ७२ मत्स्येंद्रआरूढलेसिंहासनीं । पुढेंहोतीमंगळगाणी । वारांगनानृत्यतेक्षणीं । परमानंदवोढवे ७३ षोडशोपचारीपूजन । अर्पियेलींरत्नभूषण । कायावाचातनमनधन । अर्पणकरीनाथातें ७४ केशरमृगनाभस्रक्चंदन । आपुलेहस्तींकरीलेपन । हेमतडित्प्रार्थतगटवसन । परिधानकरीस्वहस्तें ७५ राज्यसमग्रसमर्पिलें । स्वयेंदास्यत्वअवलंबिलें । क्रीडाविलाससुखसोहळे । अष्टभोगभोगित ७६ शंक्रापरीदिव्यभोग । रतिसुखादिअंगसंग । जेविरतीसवेंअनंग । परमअनुरागअन्योन्य ७७ नटळेकदाभविष्यभोग । विषयकिंवावैराग्य । जेजेकाळींजोप्रसंग । भोगिल्यावीणचुकेना ७८ मत्स्येंद्राऐसापरमयोगी । पाहाकैसाविषयभोगी । मोहनियेएकांतप्रसंगीं । श्रीशंकरमोहिला ७९ मत्स्येंद्रभोगितीराज्यभोग । परीतेलीलाब्धीचेतरंग । नकळेवर्मकोणमार्ग । अगाधकृतीजयाची ८० जेंजेंहोणारभविष्यगती । तेंतेंकदांनचुकेकल्पांतीं । ईश्वरसूत्रविचित्रगती । कदांअन्य

---

१ परिमळा नावाची राणी २ मस्तक ३ देव ४ ब्रह्मदेव ५ वेश्या ६ कस्तुरी ७ पुष्पमाळा ८ वीज ९ इंद्र १० प्रीति.

थानऱ्हेची ८१ कौसल्यादशरथविघडली । ब्रह्ममूत्रेंगांठीपडली । यशहानिमृत्युजेजेकाळीं । तेतेकाळींजा
णिजे ८२ मत्स्येंद्राऐसाविरक्त । परीपरिमळेसिझालासक्त । पाहातांदिसेअनुचित । त्याचेंसामर्थ्यअगाध
८३ कृष्णेंकेलेंपरद्वार । तयासीकायह्मणावेंजार । पराशराचाव्यभिजार । कैसाह्मणावासांगपां ८४ जोमहारा
जबादरायण । अंबालिकेभोगदान । पंडुधृतराष्ट्रउत्पन्न । परमश्रेष्ठविदुरादी ८५ द्रौपदीचेपंचभ्रतार । तरी
तोकायअनाचार । ईश्वरइच्छेंविचार । सदाचारतोचकीं ८६ नदेवचरितंचरेत् । तरीधन्यत्याचेंसामर्थ्य ।
तयादोषठेविजेपतित । तरीअधःपातहोयत्या ८७ आतांअसोहाविस्तार । परिमळाभोगीनाथमत्स्येंद्र । सुर
तानंदाचासमुद्र । उचंबळलाअगाध ८८ परिमळाप्रार्थीकरजोडून । ह्मणेमीशरणअनन्य । विनंतीविनवीक
रामान्य । भाष्यदानमजद्यावें ८९ माझावियोगनसावासहसा । हामजद्यावादृढभरंवसा । आजिजोडलेंसुकृतय
शा । तेफळाशाप्राप्तपं ९० यावरीमत्स्येंद्रवदतीवचन । माझेंइच्छीऐसेंचिमन । येथेंगोरक्षकरितांगमन ।
तोमजनेईलनिश्चयें ९१ तयाचामजसंशय । गोरक्षाचेंमहद्भय । त्यापुढेंनचलेउपाय । शिवविष्णुविरंचीचा
९२ परिमळाह्मणेप्राणनाथा । याचीतरीकायसीचिंता । मल्लाळदेशींमाझीसत्ता । शिक्षाकृतांतालावीनमी ।
९३ मगचारयोजॅनपर्यंत । रक्षकठेविलेअसतीदूत । कोणीपुरुषयेतांयेथ । शिक्षात्यासीलावीन ९४ पशुपक्षी
किंवानर । पुरुषवाचककोणीइतर । आलियायेथेंहाचिनिर्धार । शिरच्छेदकरीनमी ९५ याप्रतिज्ञेचेंकारण ।
येथेंगोरक्षयेईलह्मणोन । मत्स्येंद्रानेईलजाणुन । करीरक्षणयाहेतू ९६ देशावरफिरतफिरत । वारांगनापात
ल्यातेथ । तंवगोरक्षहिअकस्मात । तेचिस्थळींपातले ९७ तुडुंबतोयसरोवर । तटींनिबिडतरुवरें । छायेबै
सलेनारीनर । विश्रांतिघेतीयास्तव ९८ त्यावृक्षच्छायेकळापात्रें । रुदनकरितीतीव्रस्वरें । कळवळोनिअंतें ॥३॥
र । गोरक्षपातलेजवळिके ९९ त्यापुढेंउभेठाकून । पुसतेझालेवर्तमान । कांरेकरीतसारुदन । मजानिवेदनक

१ अयोग्य २ व्यासऋषि ३ ब्रह्मदेव ४ सोळा कोश ५ वृक्ष ६ मन

रावें १० येऊह्मणतीपरिहाराविण । उभयपक्षींलाजीरवाणं । कायव्यर्थदुःखसांगून । परिहारसर्वथानव्हेची १ मोरक्षवदतीतदुपरी । तुह्मादुःखर्तेंमीनिवारी । विश्वासठेवूनअंतरीं । निर्द्धारेंसीसांगिजे २ तंवतेवदतीत येवेळा । आमुचामृदंगीमृत्युपावला । तेणेंबहुतनाशजाहला । उदरनिर्वाहमगकैंचा ३ आह्मागुणिजनासुसंगी ते । असतांतेणेंचिलाभप्राप्त । व्यंगअसतांकोणपुसत । लाभकैंचामगआह्मां ४ याचकटंगाहूनिक्षुल्लग । त्यां तव्यंगतरींसर्वविलग । मगकैसेनिद्रव्यप्रसंग । आह्मांअनाथांकारणें ५ पूर्वपातकाचासंचय । यास्तवभिक्षुका चाप्राप्तदेह । प्राक्तनेंजाहलाअपाय । यासींउपायअसेना ६ ऐसासमयआह्माप्राप्त । मृदंगीनमिळेअरण्यांत । परिमळेचाधरूनआर्त । तोंहीस्वार्थदिसेना ७ उदरभरणाचीधरोनिआशा । आह्मीपातलोंयाविदेशा । आतां आमुचीनैराशा । दुर्दशाप्राप्तजाहली ८ गोरक्षह्मणेपरिसारहस्य । तेथेंकुळदैवतमाझेंउपास्य । त्याचेदर्शनाचा उद्देश । जाणेअवश्यमजतेथें ९ तरीतुह्मासवेंमीयेईन । मजन्यावेंसांभाळून । प्रसंगेंमृदंगहीवाजवीन । पडेन उपयोगींतुमच्या १० गुरुकार्याकारणें । नीचावेंहीदास्यत्वकरणें । सद्गुरुसेवेचेंमहिमान । स्वयेंजाणेगोरक्ष ११ मीकरीनतुमचेंसेवन । पोटापुरतेंद्यावेंअन्न । वस्त्रजेंअसतीजीर्ण । त्यावींकौपिनेंपुरतीं १२ तंवतेवदतीपुरु षवेष । तेथेंकैसाहोईलप्रवेश । संतोषसंशयमानस । कैसेंहोईलनेणवे १३ गोरक्षह्मणेमीविदेही । मजसर्वथादेह चिनाहीं । नरनपुंसकस्त्रीव्यक्तीहि । व्यक्तित्रयावेगळा १४ श्रीगोरक्षमहिमान । कायजाणतीअज्ञानजन । कींमूर्खाहस्तींअनर्घ्यरत्न । कायपरीक्षातयासी १५ कींप्लवंगमासुमनशय्या । कींक्लीबांतेंलावण्यभार्या । कीं शवापेंहातींवार्या । रत्नमणीदिधला १६ तेविवारांगनानाथानेणती । असोगोरक्षतयासवेंअसती । सत्वर पातलेनगराप्रती । परिमळेचेतधवां १७ नगरद्वारींयेतीसम्यक । तोंद्वारप्रदेशींद्वाररक्षक । तयापुसतीरा जसेवक । कोठोनिआलांसांगिजे १८ तंवतेवदतीआह्मीगुणिजन । स्वयेंकरितोंनृत्यगायन । आह्मा

---

१ उत्तम गायन २ गवत ३ दैव ४ विघ्न ५ गुह्य गोट ६ जुनी ७ लंगोटी ८ मोठ्या किंमतीचें ९ वानर १० नपुंसकास

ऱ्हावेंराजदर्शन । इच्छाधरोनिपातलों १९ सर्वोचेगेलेसभोसिदूत । मत्स्येंद्ररायासींकेलेंश्रुत । तयांपरिमळा आज्ञापित । शीघ्रआणावेंतयांसी १२० भद्रासनींनाथमत्स्येंद्र । जेविसुरगणींवेष्टिलाइंद्र । कींतारामंडळी पूर्णचंद्र । सभेनरेंद्रतेवितो २१ लेखकपरिचारककामिनी । कनकदंडीवेत्रपाणी । एवंसर्वहीनितंबिनी । से वकमहचरसर्वत्या २२ सिंहलद्वीपलावण्यखाणी । तेथेंनिपजतीदिव्यपद्मिणी । सुस्वरूपसर्वनितंबिनी । पा होनिनागिणलिज्जित २३ त्यांतलावण्यसोगपरिमळा । दुजीतैसीचशीतळा । जिचेंसौंदर्यदेखोनडोळां । चं द्रासिलागेक्षयरोग २४ जेविप्रदोषकाळींकर्पूरगौर । नृत्यकरितीश्रीशंकर । मृदंगघेतसेइंदिरावर । टाळवा जवीविधाता २५ वीणाघेऊनसरस्वती । सुस्वरगायनकरीप्रीतीं । तालधरीश्रीगणपती । निर्जरतिष्ठती सेवेंत २६ मुळींचाचआहेअभ्यास । गोरक्षअवतारहृषीकेश । तोषवीतसेव्योमकेश । तोमत्स्येंद्रशिवजाणोनी २७ गायनाचारंगवाढवला । तंवमृदंगांतूनिशब्दनिघाला । चलोमत्स्येंद्रागोरक्षअलाा । दर्शनालातुम च्या २८ वारंवारनिघेध्वनी । नाथऐकतीआपुलेश्रवणीं । दशदिशाविलोकितीनयनीं । दृष्टीनपडेपाहातां २९ मर्मज्ञजाणतीवर्म । येरावाउगाचिव्यर्थभ्रम । गुरुपुत्रसर्वज्ञनिःसीम । तयावीणकळेना १३० ज यासिनादानुसंधानीमन । तयासींचहोयउन्मन । टकमकापाहातीइतरजन । गुरुपुत्रखूणजाणती ३१ कळ वळोनिकृपासमुद्र । अभयवदतीनाथमत्स्येंद्र । आतांप्रगटोनकरीभद्र । भेटेसत्वरमद्वत्सा ३२ तुझियेवियो गाचींरजेनी । आतांनसाहेअर्धक्षणी । प्रगटहोईप्रकाशतरणी । उदयअभ्युदयकरीकां ३३ जेविजळदबुंथीसां डुनी । चिद्घननभींप्रगटेवासरमणी । यापरीपरिसोनिवरदवाणी । गोरक्षनाथप्रगटले ३४ अकस्माततेजफांकलें । कींउष्णचांदणेंएकवटलें । दशदिशाकोंदाटलें । भरूनिउरलेंसबाह्य ३५ तेजनसाहेह्मणोन । सर्वस्त्रियांनीझांकिले नयन । स्वरूपसौंदर्यसगुण । मत्स्येंद्रचरणधरीतसे ३६ कींसीताशुद्धीकरोनमारुती । येऊननमस्कारीरघुपती

---

१ देव २ नक्षत्रांचा समुदाय ३ मालदार ४ विष्णु ५ रात्र

कींसंजीवनीसाध्यकचाप्रती । बृहस्पतीतेंवंदिलें ३७ कींद्वादशवर्षेतीर्थाटण । करोनिपातलाअर्जुन । युधिष्ठि राकरीनमन । पदींमूर्घ्नीठेवित ३८ जेविंएकुलतानंदन । विदेशींगेलाबहुतादिन । तोमातेसिभेटलाक्षेमकल्या ण । अन्योन्यहर्षज्यापरी ३९ कींधेनुवत्सविघडलें । तेंतत्काळतीतेंभेटलें । कींहरणीचेंपाडसदुरावलें । येऊ निमिळालेंपैजैसें १४० असोगोरक्षेंवंदिलेंचरणारविंद । ब्रह्मानंदजयजयशब्द । सुमनेंवोपितीविबुधवृंद । तो ब्रह्मानंदनवर्णवे ४१ अनुहतवाद्यांचेसुस्वर । वाजूंलागलेएकसर । भेटोंपातलामत्स्येंद्रकुमर । जोकांअवतार विष्णूचा ४२ हर्षवोसंडोनिपोटीं । चरणींघालीसद्दढमिठी । सद्गुरुह्मणतीउठाउठी । वदनदृष्टींपाहूंदे ४३ हृदयींधरिलेंदृढकवळोन । कुरवाळिलेंगोरक्षआनन । जीवशिवासिआलिंगन । जेविंषडाननमहेशा ४४ जीव शिवापडलीगांठी । मगकेवितयांपडेलतुटी । नेविसारांशाच्यागोष्टी । जेविंसंगमसरितेचा ४५ हस्तींधरोन अंतःपुरांत । नेतेझालेगुरुसमर्थ । रत्नचौरंगींगोरक्षनाथ । बैसविलेआवडीं ४६ सुगंधतैलेंमंगलस्नान । कर विलेंपीतांबरपरिधान । दिधलींजडितरत्नभूषण । सुरसपक्वान्नेंवाढिलीं ४७ लघुचीरेंघेऊनकरीं । उभ्याति ष्ठतीलावण्यनारी । जोपदार्थजेअवसरीं । सिद्धीपरीपुरविती ४८ गोरक्षाचेंपाहोनिआनन । ह्मणतीधन्यप्रस वलीजननीरत्न । चित्तींस्त्रियाकरितीनमन । दुजामदनादिसतो ४९ कुमारदशारूपसंपन्न । पाहूनिस्त्रीअतित ल्लीन । कोणकोठीलकायह्मणोन । कैसाएकटापातला ५० एकाएकींहाअकस्मात । आलानकळेईश्वरीचरित । मार्गीरक्षकअसतीबहुत । तरीकेवियेथेंप्रगटला ५१ अगाधईश्वराचीसत्ता । नेणोंकैसाकोठेंहोता । भेटोंआला मत्स्येंद्रनाथा । हेंआश्चर्यदिसतें ५२ यावरीवदतीतदोत्तरा । बहुरत्नाहेवसुंधरा । कोणकैसायेविचारा । अनु मानसहसानव्हेची ५३ जेविंगोकुळींअक्रूरआला । संशयझालागोपिकांला । तैसाचिप्रकारहाहीझाला । गोरक्ष आलाह्मणोनी ५४ जयाचेंभयहोतेंमनीं । तोचिदेखिलाआजिनयनीं । ईश्वरमायेचीअगाधकरणी । ब्रह्मादिकां

१ समर्थी. २ मुख. ३ काम. ४ पृथ्वी. ५ डोळ्यानीं.

मस्तकींठेवूनिवरदपाणी । उपदेशूनजातसे ७ पुढेंजातांविप्रपुत्र । तयाउपदेशिलागुह्यमंत्र । तोचित्सुखानि मग्नअहोरात्र । चिद्रंजननामयाहेतू ८ जोसच्चिदानंदचिद्घन । तोचातकउत्पत्तीसवर्षेंजीवन । त्याउत्पत्ति नाथापासुन । प्रवृत्तिनाथलाधले ९ प्रवृत्तिपासावहंसनाथ । हंसेंनिरंजनाकेलेंसनाथ । तेथूनिसिद्धनाथानिज गुह्यप्राप्त । पुढेंभैरवनिजगुरू १० तोभैरवसद्गुरुनाथसमर्थ । ज्याचापराक्रममहिमाअद्भुत । कीर्तिजघन्यसिंधु वलयांकित । अगाधसामर्थ्यजयाचें ११ तेणेंकरविलाहाग्रंथ । परीग्रंथापूर्वीतोसमाधिस्थ । त्याचाचमस्तकीं वरदहस्त । ग्रंथसमस्तसमाप्तहा १२ पाहतांतृणाचापुतळा । तोवायुवेगेंहालेअवलीळा । तेविग्रंथहादीनदया ळा । सिद्धीपावलातवसत्य १३ कींअंधडोळसासवेंविचरत । कींयजमानअसतांश्रीमंत । आश्रितप्रपंचीनसे दधात । तेवितवसत्यग्रंथहा २१४ कींसमर्थदाताधनसंपन्न । याचकाकरीधनसंपन्न । तेविसद्गुरूनवसतेनें । ग्रं थसिद्धीपावला २१५ मीस्वामीचाकायहोऊंउत्तीर्ण । मूर्खमुखेंवदविलाग्रंथपूर्ण । जेविपारिसेंकेलेंलोहसुवर्ण । ते विमहिमाननाथाचें २१६ पौरजमवाहनाथपंथ । जोजगद्वंद्यजगविख्यात । जनीजन्मावेंयावंशांत । जेविपशूं तसिंहपैं १७ वरहभरद्वाजाचासानुकूळ । पाहातांपशुपक्षीचतेकेवळ । परीदर्शनेंतयांचेंमहत्फळ । भक्ष्यनिंद्य परिवंद्य २१८ तेंकीटकमांसवायसभक्षिती । नपाहातीगुणदोषयाती । परीबुधेजनजयाचाशकुनघेती । परम प्रीतीकारणें २१९ कींअष्टादशवर्णं । त्यांतश्रेष्ठजेविब्राह्मण । तोभ्रष्टअसोपरीश्रेष्ठजाण । तयानमनचिकरावें२० धन्यधन्यनाथसांप्रदाय । केवळकामदुहाहेजगन्माय । जडजीवांहोऊनसदय । पान्हावलीजननीहे २२१ मुमु क्षातेंअर्थतृप्ती । निराधारियाकैवल्यप्राप्ती । जीवातेंशिवचिकरिती । कैवल्यसंपत्तीदेउनी ३२२ आ सोकळसाआलेंनिरोपण । हेंप्रसादशिखरप्रसादवचन । नानाइतिहासजडितरत्न । श्रवणनेत्रेंविलोका २३ प्रथमाध्यायींमंगलाचरण । गणेशसरस्वतीगुरुनमन । ग्रंथकर्तेंप्राकृतगीर्वाण । आणिसंतश्रोतेवं

---

१ विद्वान्, ज्ञाते अथवा. पंडित. २ मनोरथ परिपूर्ण करणारी.

 दिले २४ दुष्टभारें दुःखपावोन । पृथ्वीप्रार्थीकमळांसन । त्रिधिसहरमारमण । येतेझालेकैलासा २५ द्वितीयां 
तउपदेशिलीहैमवती । मकरोदरींमत्स्येंद्रोत्पत्ती । दीक्षानुग्रहणमत्स्येंद्राप्रती । आदिनाथेंदीधला २६ तृती
॥९॥ यांतहेंचिकथन । गोमयींगोरक्षणप्रगटोन । चतुर्थांतपाताळींजाउन । पातांजळीसाधिला २७ आणकिगोरक्षप्र ॥२८॥
श्न । मत्स्येंद्रेंनिवेदिलेंयोगगुह्यज्ञान । पंचमाध्यायींहेंचिवर्णन । सद्बोधातेंउपदेश २८ नाथवरदप्रसाद ।
यासीकरोनिअनुग्रहबोध । गोरक्षपुरीनिर्मोनिप्रसिद्ध । नाथवरदस्थापिला २९ षष्ठमांतचौरंगीजन्मकथन ।
बदरिकाश्रमींभुजेश्वरगमन । सप्तमांतचक्रधराख्यान । पिशाचगोरक्षउद्धरी ३० सत्वाग्रेरपिठावरीज्ञान । म
त्स्येंद्रसांगतांनमानीजन । सिंदुरपुरीचानृपतिजाण । भाळचंद्रउद्धरिला ३१ अष्टमाध्यायींहेंचिकथन । विप्र
पुत्राचेचिरिलेश्रवण । झोळींघालीद्विजनंदन । अपरोक्षज्ञानवदलातो ३२ आणविटाक्षभिक्षामागुन । अक्ष
केलागुरुसमर्पण । नव्यांतब्रह्मांडसमाधीपूर्ण । सुदर्शनलीलावतीपैं ३३३ दशमांतहाचिइतिहास । बतीसाशि
राळीनागपंचमीस । दंदशूकआसमास । उत्पन्नकेलेगोरक्षें ३४ सोमदत्तनृपवरउद्धार । आणिविश्वश्रवाऋषि
पुत्र । उमाभार्यापरमपवित्र । गोमंतकींव्याघ्रादिउद्धरिली ३५ एकादशांतहेंचिकथन । चंद्रचूडसुप्रभआख्या
न । चर्पटोउपदेशदीक्षाकरीग्रहण । सुभद्रागोरक्षउद्धरी ३६ पुष्करयात्राबाराव्यांत । गोरक्षेंजेवविलेसिद्धमहं
त । तेराव्यांतचौरंगीनाथ । नंदनवनींपैंगेले ३७ चतुर्दशापासूनसत्रापर्यंत । भर्तृहरीआख्यानबहुत । चिरं
जीवकेलाभर्तृहरीनाथ । गोरक्षसमर्थजगद्गुरू ३८ अष्टादशापासून । पंचाध्यायींगोपेंदुकथन । कानीफजालंद
रीमहदाख्यान । रसिकरसाळपरमतें ३९ तेविसाव्यांतगोरक्षमारुती । संवादझालापरमप्रीतीं । नं
तरमल्लाळदेशाप्रती । गोरक्षजातीस्वइच्छें ४० चोवीसाव्यांतमत्स्येंद्रदर्शन । पंचविसाव्यांतमैनीउत्पन्न ।
अनेकप्रगटविलेंहेंमहिमान । अगाधमाहात्म्यजयाचें ४१ सविसाव्यांतअनुसंधान । दत्तात्रेयगोरक्षअनुवादगहन । ॥९॥

---

१ दैत्यांच्या मारानें. २ ब्रह्मदेव. ३ विष्णु. ४ सर्प. ५ मधुर गोड.

ज्ञानमेघवर्षलेसघन । आर्तचातकतृप्तपैं ४२ सत्ताविसाव्यांतकथासार । शंकराचार्यशंकरावतार । तिहींपराभ वूनिमंडणमिश्र । धर्मस्थापिलाकलियुगीं ४३ हस्तामलकसंवादसुरस । भैरवगोरक्षवेदव्यास । प्रेषिलेआचार्यप रिक्षेस । चांडाळवेषेंकरूनी ४४ अठ्ठाविसाव्याअध्यायींजाण । ज्ञानेशउत्पत्तिस्थितिकथन । वेदवदविलेपशुमु खांतून । अघटितविंदानदाविलें ४५ सद्गुरुकृपेचेंसामर्थ्य । पंगुलंघितीमहापर्वत । मुकावाचस्पतिहोत । ज न्मांधपरीक्षिरत्नातें ४६ असोकलीदुर्मददुर्धर । यास्तवविष्णुबौद्धावतार । परीभक्तमहिमाप्रतापथोर । नचले निर्धारभक्तांपुढें ४७ एकजेवविलाबोलविलाभक्ती । गृहींराहविलापरमप्रीतीं । भक्तांवशझालाश्रीपती । अद्भुत कीर्तिभक्तांची ४८ कलींतपाहानिश्चितीं । वर्णसंकरधर्मलोपती । येविषयींश्लोकव्यासोक्ती । तोचिश्रोतींपरि सावा ॥ ४९ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ कलौदशसहस्राणिविष्णुस्त्यजतिमेदिनीम् ॥ तदर्धंजान्हवीतोयंतदर्धंग्रा मदेवताः ॥ १ ॥ टीका ॥ कलींतविष्णुव्यासवचनीं । दशसहस्रवर्षेंराहीलमेदिनीं । पंचसहस्रवर्षेंस्वर्धुनी । याकलियुगींअसेपैं ५० करोनियांसगरोद्धार । सामान्यदैवतेंसमग्र । लोपतींझालींनिरंतर । तदर्धवर्षेंपैंजाती ५१ पुढेंपुढेंगोरक्षजागृती । होईलऐसीहीमत्स्येंद्रोक्ती । जीवपातकीपावनहोती । नाथप्रतापेंकरूनी ५२ सांप्रतपाहतांअळंकापुर । पंढरीहूनसुलभक्षेत्र । जगदोद्धारार्थज्ञानेश्वर । स्फुरदजागृतअद्यापी । ५३ हेअठ्ठावीसअध्यायपरिकरअनर्घ्यमणी । सद्भावेंवोंवीएकागुणीं । हाअठ्ठाविसावामेरुअग्रणी । सदास्मरणीं असावा ५४ कींहेंअठ्ठावीसखणाचेंमंदिर । अठ्ठाविसावामुकुटशिखर । वरीकीर्तिध्वजफडकेसुंदर । आर्तांपदरें पालवी ५५ कींसत्तावीसअध्यायहेनक्षत्र । अठ्ठाविसावापूर्णचंद्र । त्रितापेंसंतप्तजेकांनर । त्यांशांतशीतळक रवीजो ५६ एवंअध्यायहेअठ्ठाविस । हेंचिसाहाचारअष्टादश । यांचामथितार्थसारांश । रहस्यजाणतेश्रेष्ठपैं ५७ जयासत्ताविसांमाजीबाविसावा । तयासाठींमाजीअठ्ठाविसावा । तयाद्वादशामाजीप्राप्तनववा । लाभवैभव

---

१ पाठविले. २ बृहस्पती. ३ गंगा. ४ मोठ्या मोलाची. ५ कायिक-वाचिक- मानसिक

पाविजे ५८ कींअठ्ठावीसयुगपर्यंत । भीमातटींतिष्ठेपंढरीनाथ । तेविहेग्रंथींश्रीआदिनाथ । उमेसहितस्थिर सदा ५९ जेविगौतमेंआणिलेंगंगेप्रती । कींभगीरथेंआणिलीभागीरथी । पुंडलीकेंआणिलारुक्मिणीपती । दीनोद्धारकरावया ६० तेविभवानीचेप्रयत्नयत्नीं । नानापंथेंप्रवाहेदेवतटिनी । जेजडजीवबद्धपाणी । त्यांतेंउद्धरणी चिद्गंगा ६१ हेभवरोगार्तेदिव्यौषधी । स्मरणेंचिनाशआधिव्याधी । सदांओळंगतीसकळसिद्धी । हेभवाब्धि तरणीसुनौका ६२ आदिनाथलीलाग्रंथ । अठ्ठावीसअध्यायपर्यंत । आदिमध्यआणिअंत । आदिनाथव्यापवें ६३ जेविव्रताचेंउद्यापन । तेविहाअध्यायकरितांश्रवण । कींकेलियाअनुष्ठान । देवतासुप्रसन्नहोतसे ६४ कीं मंत्रपुरश्चरणाचियापाठीं । सिद्धीसाधेपैंशेवटीं । तेविअध्यायऐकतांश्रवणपुटीं । उठाउठींनिजलाभ ६५ अपुत्रियापुत्रसंतान । धर्मार्थियांप्राप्तधन । विद्यार्थीविद्यासंपन्न । ग्रंथपठणेंकरोनी ६६ योगसिद्धीवाक्सिद्धी । मंत्रयंत्रअनेकऔषधी । पारायणींयथाविधी । अष्टसिद्धीवोळंघती ६७ ज्याचेंगृहींनाथग्रंथ । त्याससंरक्षीगोरक्षनाथ । तेथेंनराहातीभूतप्रेत । दरिद्रदुरितांपळसुटे ६८ तेगृहींनवग्रहसुप्रसन्न । रोगगंडांतरेंजातीपराभवून । असत्यनव्हेगोरक्षवचन । सत्यसत्यत्रिवाचा ६९ हाग्रंथपयतीर्थसमरस । निवडूंजाणतीसुजनहंस । जे मानसवासीपरमहंस । तेसोहंहंसअविनाशी ७० केवळहाग्रंथनोहेसामान्य । याइतरनजाणतीसामान्य । हापरब्रह्मरसापरममान्य । अतिमहान्जोमहात्मा ७१ जोश्रीमानसद्गुरुभैरव । सदासुप्रसन्नवरदोभव । तत्प्रसादेंग्रंथवैभव । अभिनवलाभयेहाता ७२ हेंभैरवगुरूचेंवरदपुस्तक । तत्पदींठेवूनदृढमस्तक । वारंवारजोडोनिहस्तक । वरमागोनिघेतसें ७३ नर्मदेचेउत्तरतीरीं । विक्रमशकाचेमाझारीं । श्रीभैरववरदेंवैखरी । आदिनाथनमीतसे ७४ ॥ संवत १८९० नव्वद ॥ विश्वावसुसंवत्सरप्रसिद्ध । विटपक्षेत्रींग्रंथअगाध । सिद्धझालागुरुकृपें ७५ ॥ शके १७५६ छप्पन्न ॥ गुरुवासरपरमसुदिन । जयंतिसंवत्सरनामाभिधान । ध्रुवजपदश्रोतयां ७६

१ [illegible]

## या ग्रंथांतील ओंव्यांची संख्या.

| अध्याय. | ओंव्या. | अध्याय. | ओंव्या. | अध्याय. | ओंव्या. | अध्याय. | ओंव्या. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १४५ | ९ | २६१ | १७ | १८९ | २५ | १९१ |
| २ | २१६ | १० | १९३ | १८ | २३७ | २६ | १५८ |
| ३ | २२३ | ११ | १५४ | १९ | १७५ | २७ | ३२० |
| ४ | १७८ | १२ | १३१ | २० | २९५ | २८ | ३७९ |
| ५ | १७३ | १३ | ११८ | २१ | १८९ | | |
| ६ | १७६ | १४ | २०९ | २२ | १९३ | | |
| ७ | १६४ | १५ | १७५ | २३ | १३१ | | |
| ८ | १६३ | १६ | ८९ | २४ | २०६ | | |

एकंदर ओंव्यांची संख्या ५४९३.

या ग्रंथाचे कर्ते श्रीआदिनाथ भैरवनाथ हे संस्थान निघोजे, तालुका खेड, जिल्हा पुणें येथें जन्मले व श्रीक्षेत्र संस्थान नाशिक येथें वैशाख वद्य ११ एकादशी शके १७६७ त समाधिस्थ झाले.

मासोत्तमचैत्रमास । रामजयंतीपुण्यदिवस । शुद्धपक्षमाध्यान्हास । ग्रंथसमाप्तपैंझाला ७७ श्रीमत्आदिनाथ प्रसन्नोभवतु । श्रीरस्तुकल्याणमस्तु । राजद्वारेविजयोस्तु । शुभंभवतुसर्वत्र ७८ श्रोतेसज्जनसद्गुरुमूर्ती । आदिनाथवंदोनिकरीविज्ञप्ती । तुह्मीश्रीगुरुभैरवमूर्ती । आदिनाथविश्रांतीतत्पदीं ३७९ इतिश्रीआदिनाथलीलामृतग्रंथ । आदिनाथविरचित । अध्यायअष्टाविंशतिसमाप्त । श्रीआदिनाथार्पणमस्तु २८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ अध्याय ॥ २८ ॥ ओंव्या ॥ ३७९ ॥ ॥ छ ॥



हा ग्रंथ मुंबईत रा० रा० गोपाळ नारायण आणि कंपनी मालक यांचे करितां रामचंद्र कृष्ण धिगे वेरेरकर यांणीं गोपाळ नारा० कंपनीच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला. मिति चैत्र शुद्ध १ बुधवार शके १८२० विलम्बी नाम संवत्सरे ता० २३ माहे मार्च १८९८ कालिकादेवीरोड. घरनंबर १६.

॥ इतिनाथलीलामृतंसमाप्तम् ॥